# संगीत मानापमान.



हें नाटक

## रा० रा० कृष्णाजी प्रभाकर खाडीलकर बी. ए.

" संगीत विद्याहरण, " " सत्त्वपरीक्षा, " ' प्रेमध्वज, '
' भाऊबंदकी, ' ' बायकांचें बंड, ' ' कीचकवध, ' ' सवाई
माधवराव यांचा मृत्यु, ' ' कांचनगडची मोहना, '
इत्यादि नाटकांचे कर्ते, यांनीं लिहिलें.

तें

रा. रा. शंकर नरहर जोशी यांनीं पुणें येथें " चित्रशाळा "
छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.



( आवृत्ति पहिली )

सन १९११.

किंमत एक रुपया.

# प्रस्तावना.

गरिबांना कस्पटाप्रमाणें लेखणारा अविचारी श्रीमंतांचा दुरभिमान व अपमान झाल्यामुळें चिडलेल्या गुणी गरिबांचा क्रोध, या मानापमानाच्या कात्रींत सांपडल्यामुळें दोन वेळां मोडलेलें धैर्यधर व भामिनी यांचें लग्न, खऱ्या प्रेमाचा पगडा मनावर बसून निरभिमानी बनलेल्या भामिनीच्या चतुर लीनतेमें अखेरीस कसें घडून आलें, याचें वर्णन या नाटकांत केलें असून, अंगावर दागिन्यांचीं ओझींच्या ओझीं लादून घेणाऱ्या लक्ष्मीधराचा आचरटपणा, आणि गरिबांविषयींचा तिरस्कार अंगीं भिनल्यामुळें गुणी गरिबांचा द्वेष करणाऱ्या विलासधराचा खुनशीपणा या दोन नटांमधून, सदर प्रेमाचे प्रवाहास—तो स्पष्ट, जोराचा व मर्यादित दिसावा म्हणून,—वहावयास लाविलें आहे.

संगीत नाटकांतील पदांकडे गायकी दृष्टीनें पाहण्याची संवय वाचकांना लागावी म्हणून पदांच्या स्वरमालेचें ( नोटेशन ) पुस्तक स्वतंत्र न काढतां किंवा तसल्या स्वतंत्र पुस्तकाकरितां पदांचा उपयोग इतर कोणासही करूं न देतां, नाटकांतच प्रत्येक पदाचे खालीं ' स्वरमाला ' देण्यांत आली आहे.

बाजाची पेटी वाजविण्यांत अत्यंत कुशल म्हणून महाराष्ट्रांत मशहूर असलेले रा. रा. गोविंद सदाशिव टेंबे यांनीं या नाटकांतील पदांच्या चाली दिल्या असून पदांची ' स्वरमालाही ' त्यांनींच तयार केलेली आहे. या कामीं ' किर्लोस्कर संगीत मंडळींतील गायनपटु नट रा. नारायण दत्तात्रय जोगळेकर व रा. नारायण श्रीपाद राजहंस ऊर्फ बालगंधर्व, आणि माझे गवई मित्र रा. रा. विठ्ठल महादेव ऊर्फ बाबूराव फडके, यांनीं आस्थेनें व हौसेनें मदत केली आहे. या उपकाराबद्दल रा. टेंबे, रा. जोगळेकर, रा. बालगंधर्व, व रा. फडके यांचे मानावे तितके आभार कमीच होत.

गद्य नाटकांतच गुरफटून राहिलेल्या मनोवृत्ता ' मंडळींच्या ' मृदु, गोड, व गुंगविणाऱ्या गायनानें ' संगीताकडे ' खेंचून नेल्याबद्दल, पुस्तकांत चित्रें घालण्याकरितां नटांचे त्या त्या प्रसंगांचे फोटो दिल्याबद्दल, आणि पुस्तकरूपानें नाटक प्रसिद्ध होण्यापूर्वी त्याचे परिश्रमानें व कळकळीनें बसविलेले प्रयोग करून दाखवून उपयुक्त सूचना केल्याबद्दल ' किर्लोस्कर संगीत नाटक मंडळी ' चा मी फार फार आभारी आहें.

पुणें.
तारीख १७ एप्रिल १९११

ग्रंथकर्ता.

# संगीत ' मानापमान ' नाटकांतील पदांचे ' स्वरमाले-' मध्यें उपयोगांत आणलेलीं सांकेतिक चिन्हें व त्यांचें स्पष्टीकरण.

**स्वरांचीं चिन्हें**—सप्तस्वर सा= षड्ज; रे= ऋषभ; ग= गांधार; म= मध्यम; प= पंचम; ध= धैवत; नि= निषाद. सा रे ग इ० मंद्रसप्तक. सा रे ग इ० मध्यसप्तक. सा रें गं इ० तार सप्तक. रे ग म इ० कोमल स्वर. तीव्र-स्वरांना कोणतीही खूण नाहीं.

☞ ( १ ) ज्या स्वराचे माथ्यावर अनुस्वार (·) दिला असेल, तो स्वर इतक्या जलद घेणेचा आहे कीं पुढील स्वरास त्याचा केवळ धक्का लागावा. ( २ ) ' मुरकी ' व 'ताना' यांचे स्वर कंसांत दिले असून त्या त्या कंसाखालीं जितक्या मात्रा असतील तितक्या मात्रांच्या वेळांत कंसातील स्वर उच्चारावयाचे आहेत ( ३ ) मागील स्वर पुढे लांबविण्याचा असल्यास, जितक्या मात्रा तो लांबविण्याचा असेल तितक्या मात्रांच्या वर—अशी रेघ त्या स्वरापुढे दिली आहे.

**तालाचीं चिन्हें**—पद्यांतील प्रत्येक अक्षर एक मात्रेचें समजावे. गुरु अक्षरांच्या दोन मात्रांपैकीं पहिली अक्षरानें व दुसरी अवग्रहानें म्हणजे ( ऽ ) अशा चिन्हानें दाखविली आहे. पद्यांतील अक्षराखालीं सम, ताल, काल, यांची चिन्हें येणेंप्रमाणें दिली आहेत. × समेचा ताल. —साधा ताल. ० काल.

☞ ( १ ) लघु किंवा गुरु अक्षर असून एक किंवा दोहोंहून अधिक मात्रांचे वेळेपर्यंत, स्वरांचा भरणा व्हावा म्हणून, जितक्या मात्रा वाढविणें चालीस योग्य असेल तितके अवग्रह त्या अक्षरापुढें दिले आहेत. ( २ ) जेथें पदांतील तालाचे एक किंवा कांहीं आवर्तनाची लय इतर आवर्तनांहून भिन्न असेल तेथें त्या त्या आवर्तनासंबंधानें त्या पदाचे स्वरमालेखालीं तशी सूचना दिली आहे. ( ३ ) पदामध्यें कांहीं अक्षरें उच्चार केल्या न केल्यासारखीं असतात; अशा ठिकाणीं टीपेंत त्यांना ' अर्धोच्चारित ' किंवा ' अल्पोच्चारित ' म्हटलें आहे.



# संगीत मानापमान.

## अंक पहिला.

( सूत्रधार व पारिपार्श्वक पूजापात्रें घेऊन उभे आहेत. )

### नांदी.

[ पद १—राग हमीर, ताल त्रिवट. ]

**नमन नटवरा विस्मयकारा । आत्मविरोधी कुतूहलधरा ॥ध्रु०॥ विवाह करुनी मदन जाळिला । मग मदनमित्र इंदु सेविला ॥ धनवैरागी द्यूत खेळला । गौरीचा तो अंकित झाला ॥ परमेशाच्या ऐशा लीला । कवि कृष्ण गात विस्मयकारा ॥ १॥**

[ पद २—" राम नामकी ओट " या चालीवर. ]

**मोद हराचा प्रेम वाढवो । क्रोध तयाचा गर्व घालवो ॥ध्रु०॥ रोषभरें तो विपिनीं बसतां । शिके पार्वती ललित लीनता ॥ नाचत गातां मुदित शंकरा । ने परतोनी प्रेममंदिरा ॥ १ ॥**

सूत्र०—परमेश्वराचें ध्यान इतकेंच पुरे. तुम्ही असें करा, हीं पूजापात्रें आंत नेऊन ठेवून तिला जरा इकडे पाठवून द्या.

---

( १ ) राग हमीर, त्रिवट.

प म प   प म प म् ग   ध ध ध   ध नि नि सां   नि ध प
न म न   न ट व रा ऽ   वि स्म य   का ऽ रा ऽ | न म न...

ग म् रे   ग म् ध म प   ग म् रे रे नि रे सा
आ ऽ त्म   वि रो ऽ धी ऽ   कु तू ऽ ह ल ध रा ऽ ॥ ध्रु० ॥

[ पुढें चालू.

**पारि०**—महाराज, नाटकाच्या प्रारंभीं नेहमींच आपण मला अशी आज्ञा करीत असतां. सुज्ञ सेवकानें धन्याला वारंवार तोच तो हुकूम करण्याची तसदी देतां कामा नये; म्हणून आज ईशपूजेला येण्यापूर्वींच बाईसाहेबांना विनंती केली कीं, ईशस्तवन संपतें न संपतें तोंच आपण येथपर्यंत येण्याची कृपा करावी.

**सूत्र०**—बरें केलेंत. आज बाईंच केली पाहिजे. कारण—

---

प प—प सां सां सां—ध नि रे सां नि सां ध प
वि बा ऽ ह क रु नी ऽ म द न जा ऽ ळि ला ऽ

सा ग म् ध ध म प ग म् रे सा नि रे सा—
म ग म द न मि त्र इं ऽ दु से ऽ वि ला ऽऽ

प पं सां—सां रें सां सां ध नि नी सां नीं ध प
ध नु वै ऽ रा ऽ गीं ऽ दू ऽ त खे ऽ ळ ला ऽ

ग—ग—मं ध म प ग म् रे रे नी रे नी सा
गौ ऽरी ऽ चा ऽ तों ऽ अं ऽ कि त ज्ञा ऽ ला ऽ

ध नी सां सां गं रें सां ध नी नीं रें सां ध नि ध प
प र मे ऽ शा ऽच्या ऽ ऐ ऽ शा ऽ ली ऽ ला ऽ

नि ध नी सां नि ध म प म प म प म प (धंनीं सां)
क वि कृ ऽ ष्ण गा ऽ त वि ऽ स्म य का ऽ रा ऽ ॥ १ ॥

---

(२) केदार, त्रिताल.

म्—रे रे सा रे सा म्—म् प—प म् म्
मो ऽ द ह रा ऽ चा प्रे ऽ म वा ऽ ढ वा ऽ

पं—प प ध नि ध प प मंप म्—रे सा—
क्रो ऽ ध त या ऽ चा ऽ ग र्व घा ऽ ल वो ऽ ॥ ध्रु० ॥

[ पुढें चालू.

[ पद ३—राग काफी. ताल दादरा. ]

**पंचशरें गद्यवरें वश जी झाली । नाट्यकला कवि कृष्णा माला घाली ॥ ध्रु० ॥ ऐशा या समयाला । प्रेमरसें कवि नटला । गात असे कवनाला । संगीतीं नवलीला । ऐकाया लोलुप अति सभा बैसली ॥ १ ॥**

तेव्हां तुम्ही आगाऊ घाई केलीत, हें ठीक झालें. पण काय हो, अजून कां ती येत नाहीं ?

---

प—सां सां सां—सां—ध नि नी रें रें सां धप म्
रोऽ ष भ रेऽ तो ऽवि पि नीं ऽ ब स ता ऽ

म् म्—म्—प म पधनीसां ध म प म् —रे सा—
शि केऽपाऽ वें तीं ऽ ल लि त लीऽन ताऽ

प—सां सां सां रें सां—नि ध नि सां—ध प—
नाऽच न गा ऽ ताऽमु दि त शंऽकराऽ

प—पप मपधनीसां सांधप म्—रे सा—रे सा—
नेऽपर तों ऽ नां ऽ प्रेऽम मंऽदि राऽ ॥ १ ॥

---

( ३ ) काफी, दादरा.

नी—प प ग् रे म्—म् प प—ग म् म् पधप री ग् री—
पं.ऽच श रे ऽ गऽद्य व रेंऽव श जीं ऽऽऽ झा ऽ ली ऽऽऽ

म्—म् म् प ध नी नी सां नि सां—ध नी ध प ग म्
नाऽट्य क लाऽ क वि कृ ऽ ष्णाऽमाऽ लाऽ घाऽ

प ( नि्धपम्गरिसानि्सा ) ध्रु०
लीं ऽऽऽऽऽऽऽ

सा—रे—ग्— म् म् प— प— | नि् ध ध नि् ध सांनि्धपग्—
ऐ ऽशाऽयाऽ स म याऽ लाऽ | प्रेऽम र सें ऽ क वि नटलाऽ

[ पुढें चालू.

**परि०**—मला वाटतें, त्या येणारही नाहींत. आईसाहेब मघांपासूनच दागिन्यांकरितां रागावून बसल्या आहेत. मीं विनंती केली त्यावेळीं त्या म्हणाल्या—( पद्यांत—“ मी साफ येणार नाहीं, पुन्हा बजावून सांगतें मी साफ येणार नाहीं. ” )

**सूत्र०**—खरेंच ती फार रागावल्यासारखी दिसते! मीं स्वतः जाऊन तिचीं आर्जवें केल्याशिवाय तिचा राग शांत होणार नाहीं. ( परि० व सूत्र० जातात. )

[ महिषासुरमर्दिनीचें देवालय. भामिनी व कुसुम प्रवेश करितात. ]

**भामि०**—मी साफ येणार नाहीं; पुन्हा बजावून सांगतें मी साफ येणार नाहीं. हा कायग कुसुम तुझा लोचटपणा ! मी एकदां येत नाहीं म्हणून सांगितलें, तरी पुन्हा चल चल म्हणून तुझा तगादा माझ्या मागें आहेच !

**कुसु०**—हें असें काय करतेस भामिनी ? उशीर नाहीं कां होत ? हा पहा सूर्य अस्तास चालला; बाबासाहेबांनीं तर सांगितलें, दिवे लागतात न लागतात तों सेनापती धैर्यधर यांची मिरवणूक येथें येऊन पोंचेल, आणि त्याचे आंत भामिनीला नटवून सजवून तयार करून ठेव म्हणून. अग, तुझें धैर्यधरजींशीं लग्न व्हायचें, आणि आतां नवरदेव येण्याच्याच वेळीं तूं अशी रुसलेली ! हें तुला शोभतें का ?

**भामि०**—न शोभायला काय झालें ? धैर्यधरजी पराक्रमी झाले, सेनापती झाले, तरी बाबांच्यापेक्षां गरीबच ना ? नुसत्या पराक्रमावर बायकांचें मनच बसत नाहीं. मनाची हौस भागेल इतके दागिने घालणारा नवरा बायकांना

सा—रें रे ग्— म् म् प—प— नि्—ध—नि् ध सां नि्धप ग्—
गा ऽतअ सं ऽ क व नाऽळाऽ सं ऽ गीऽ तीं ऽ न व लीऽ लाऽ
* — ० * — ० * — ० * — ०
म्—म्—पध नीं—नी नी सां सां ध नि्ध ग—म्
ऐ ऽकाऽ याऽ लंाऽ लु प अ ति स भाऽ बैऽस
* — ० * — ० * — ०
( पधधानिधपम्गरेसानिसा )
लो ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
* — ०

आवडतो. ती पहा ती रजनी पराक्रमी सूर्याला, तो आरक्त झाला असतांही, याच कारणाकरितां दूर लोटून देत आहे !

[ पद ४—" पिअरवा ते हारी " या चालीवर. ]

**हा टकमक पाही सूर्य रजनिमुख लाल लाल, परी ती नच जाई जवळि म्हणत हा काळ काळ ॥ ध्रु० ॥ तनुवरी तारा-लंकार, त्यांत भर फार इंदु होत, त्यासि घालित माळ ॥हा०॥**

आतां धैर्यधरजी येऊं देत खरें; या सूर्याची जी गत तीच दशा त्यांची केल्या-वांचून मी राहायची नाहीं.

**कुसु०**—भामिनी, असें भलतें भलतें बडबडूं नको. माझी भामिनी फार आज्ञाधारक म्हणून बाबासाहेब नेहमीं तुझी तारीफ करीत असतात. चल मुका-

( ४ ) यमन कल्याण, त्रिवट.

सा ऽ निरेगरे निरेसा—सानिध सानिध पप
हा टकमक पा ऽ ही ऽसू ऽ र्य र ज नी मुख

सा—सा सा—रे सा सा सा—ग रे ग—मधमप ग म् रे
ला ऽ ल ला ऽ ल प री नी ऽ न च जा ऽ ई ऽ ज व ळि

ग रे रे सा—रे ग रे रे ( ग म प ग रे सा )
म्ह ण त हा ऽ का ऽ ळ का ऽ ऽ ळ ॥ ध्रु० ॥

( किंवा शेवटचे सहा सुरांऐवजीं तान—गम्गरेगमपधनीसांनीधपम्गरेसा )

ग प ग प—प ध ध—नी नी ध प प—ग—रे ग प
त नु व रीऽ ता ऽ रा ऽ लं ऽ ऽ का ऽ र त्यां ऽ त भ र

ग रे सा प—ग प—प नी नी ध प रे ग प
फा ऽ र इं ऽ दु हो ऽ त त्या ऽ सि घा ऽ लि त

ग—रे-सा निरेगरे
मा ऽऽ ळ ॥ १ ॥ टकमक......

---

त्यानें त्या पलीकडच्या मंदिरांत, आणि अंगाखांद्यावर दागिने घाल. नवरदेव धैर्यधरजींची स्वारी येथें आल्यावर महिषासुरमर्दिनीचा प्रसाद त्यांच्या हातीं देतांना नवऱ्या मुलीनें लक्ष्मीसारखें सजलें पाहिजे! हा कुळाचार आहे हो. बाबासाहेब आले आणि त्यांनीं तुला अशी पाहिली म्हणजे ते रागावणार नाहींत का?

**भामि०**—कांहीं नको बाबांच्या रागाचा एवढा मला धाक घालायला! बाबांना मीं आजच सकाळीं सांगितलें, कीं मी कांहीं धैर्यधराशीं लग्न करायची नाहीं. अग, असल्या दरिद्र्याशीं कोण लग्न करणार?

[ **पद** ५—राग शंकरा, ताल झंपा. ]

**निर्धना जी वरी, आत्मवध ती करी। द्रव्यमय भूवरी प्राण आला॥ १॥ ना वसे निर्धनीं, ललितमननंदिनी। रुचिर जी राहणी सुंदराला॥ २॥ चारु वसनें जनीं, प्रसरणें मोहिनी। हीं सुखें कोठलीं निर्धनाला॥ ३॥**

( ५ ) शंकरा, झंपा.

नी—सा नी प प नीध सां नि—प—ग गप ग — पगसा
नि ऽ र्ध ना ऽ जी ऽ व रीऽ आ ऽ त्म वध तीऽ करीऽ
* — o — * — o —
सा—सां ग ग प प प प—प नी ध प नीध सांनिपगसा
द्र ऽ व्य म य भू ऽ व री ऽ प्रा ऽ ण आ ऽऽ ला ऽ ऽऽ ॥ध्रु०॥
* — o — * — o —
प—प सा सां—सां—सांसा —पनींनीं सां नि प निध सां सां नी
ना ऽ व से ऽ नि ऽ र्धनीं ऽ ललित म न नं ऽ दि नी ऽ
* — o — * — o —
सां सां सां गं—नी—रें सां—नी —नी प—नीधसांनीपगसा
रु चि र जी ऽ रा ऽ ह णी ऽ सुं ऽ द रा ऽ ला ऽ ऽऽ ॥ १ ॥
* — o — * — o —
नी—नी नीनींनीं—नी नी—— नी सां नी प—पनीध सां नी—
चा ऽ रु व स नें ऽ ज नीं ऽ प्र स र णें ऽ मो ऽ हि नी ऽ
* — o — * — o —
सां— सां गं — गं प गं सां —नी —सां नी—पं ( धपपगपगरेसासा )
हीं ऽ सु खें ऽ कों ऽ ठ लीं ऽ नि ऽ र्ध ना ऽ ला ऽऽऽ ॥ध्रु०॥
* — o — * — o

हें बघ कुसुम, बाबा रागावोत, किंवा कोणी कांहीं म्हणो, मी कांहीं त्या दरिद्री धैर्यधराशीं लग्न करायची नाहीं.

**कुसु०**—गडे भामिनी, जरा विचार कर. तूं लक्ष्मीपुत्राची मुलगी असलीस म्हणून तुला लक्ष्मीपुत्राच्याच घरीं दिली पाहिजे, असें कांहीं नाहीं.

**भामि०**—कां नाहीं ? बाबांनीं मला श्रीमंतच नवरा पाहून दिला पाहिजे.

**कुसु०**—अग, उत्तराधिपतीशीं लढण्याकरितां आमच्या पृथ्वीधर महाराजांनीं काय थोडे सेनानायक पाठवले ? पराजय पावून इतके दिवस सर्व परतून नाहीं कां आले ? धैर्यधरजींच्याच पराक्रमामुळें आज दोन महिने उत्तराधिपती मागें हटला आणि लग्नाकार्यांचे बेत करायला थोडीशी फुरसत तरी मिळाली. ज्या वीराला जयश्रीनें रणभूमीवर माळ घातली, त्याच वीराला तुजसारख्या उपवर कन्या लग्नमंडपांत माळ घालीत असतात; अशीं पूर्वींचीं कितीतरी उदाहरणें आहेत.

**भामि०**—असतील ग उदाहरणें; पण ही भामिनी दुसऱ्याचें उदाहरण पाहून वागणारी नाहीं. माझ्या वर्तनाचा कित्ता इतरांना घालून देण्याकरितां मी जन्मास आलें आहे, समजलीस.

**कुसु०**—स्वयंवरांत पण लावून, शौर्याची पारख करून, नंतर सीताद्रौपदी-सारख्या राजकन्या लग्न करीत असत; त्यांना कांहीं कळतच नव्हतें म्हणायचें ?

**भामि०**—हो हो, नव्हतेंच कळत. स्वयंवराचे वेळीं नुसत्या पराक्रमावर भिस्त ठेवण्यांत सीतेनें काय किंवा द्रौपदीनें काय, शहाणपणा दाखवला असें मला मुळींच वाटत नाहीं.

[ पद ६—" मेरे गलि आ जाव " या चालीवर. ]

**वरि गरिबा वीरा जी अबला,सुख संसारीं तें कैंवि तिला ॥ध्रु०॥**
**राघव तोडित धनु ऋषिचेपं, मग जाइ वना सीता बाला ॥ १ ॥**
**अधन धनंजय मीनवधा करी, वनीं वास मग पांचालीला ॥२॥**

( ६ ) झिंजोटी, केरवा.

रे़ रे रे रे रे सा सारेंग —नी—सा नी ध प ध —
व रि ग रि बा ऽ वी ऽ रा ऽ जी ऽ अ ब ला ऽ
* * * *

[ पुढें चालू.

**कुसु०**—मीं किती सांगितलें तरी तुझी समजूत पटायची नाहीं. त्या पहा अक्कासाहेब आल्या. सोनारानें कान टोंचले म्हणजे.—

**भामि०**—अक्का येऊं दे नाहींतर बाबा येऊं देत; कोणीं सांगितलें तरी मी ऐकायची नाहीं. अक्काचेंही लग्न व्हायचें नाहीं आणि बाबांचेंही नाहीं; लग्न व्हायचें आहे माझें हो.

[ अक्कासाहेब, चंपा, मालती व विनोद येतात. ]

**अक्का०**—वा ! भामिनी तर येथेंच आहे ! मला वाटलें होतें, अंगाखांद्यावर दागिने घालून पलिकडच्या सज्ज्यावर ताई उभी असेल. धैर्यधरजींची स्वारी इतक्यांत येथें यायची आहे म्हणे ! आणि हें ग काय कुसुम, ताईच्या अंगाखांद्यावर कांहींच नाहीं, हें कसें ?

**विनो०**—गरीबाची बायको होण्याचा धडा ताईसाहेब एव्हांपासूनच गिरवीत आहेत, असें दिसतें ! अक्कासाहेब, माहेरीं कंजारणीसारखें मिरवण्याची संवय असली म्हणजे सासरची गरीबी बाधत नाहीं.

**चंपा**—गरीबाची बायको होण्याची संवय लागावी म्हणून जर दागिने घालायचे नाहींत, तर तर गडे भामिनी, हा एवढा उंची शालू तरी कशाला नेसलीस ?

सा रे रे—सा—सारेंग नी — सा नी ध प ध—
सु ख सं ऽ सा ऽ री ऽ ते ऽ कें ऽ वि ति ला ऽ ॥धृ०॥
* * * *
म् —म् म् म् —म् म् ग म् प ध ग म् ग—
रा ऽ घ द तों ऽ डि त ध नु ऋ षि वे ऽ षें ऽ ।
* * * *
रे रे रे—सा सा सा (रेग) नी—सा नी ध प ध—
म ग जा ऽ इ व ना ऽ सी ऽ ता ऽ बा ऽ ला ऽ ॥१॥
* * * *
म् म् म् म् म्—म् म् म्—प ध ग म् ग ग
अ ध न ध नं ऽ ज य मी ऽ न व धा ऽ क रि ।
* * * *
रे रे—रे—रे गरे सा नी सा नी ध प ध—
व नीं ऽ वा ऽ स मग पां ऽ चा ऽ ली ऽ ला ऽ ॥ २ ॥
* * * *

## अंक–पहिला [ प्रवेश पहिला ].

**माल०**—धैर्यधरजींच्या घरीं इतकीं साधीं लुगडीं नेसावीं लागतील कीं, माहेरीं लकतरें नेसणें अंगवळणीं पडलेलें असल्याशिवाय कोणत्याही नवरीला सुन्मुखाच्या तसल्या नव्या साडीबद्दल धन्यता वाटायची नाहीं.

**चंपा**—बरें केलेंत ताईसाहेब, लकतरें नेसण्याचा धडा एव्हांपासूनच गिरवला नाहींत, बरें केलेंत!

**विनो०**—नवऱ्याच्या गरीबीची पहिली छाया दागिन्यांवर पडली आहे. बाबासाहेबांच्या सावलींतून निघून जेव्हां धैर्यधरजींच्या झोंपडींत ताईसाहेबांची रवानगी होईल, तेव्हां दारिद्र्याचें ग्रहण वस्त्रापात्रालाही लागल्यावांचून राहणार नाहीं. श्रीमंतींतून गरीबींत जेव्हां उत्क्रांति होते तेव्हां प्रथम दागिने नाहींसे होतात, आणि नंतर ठेवणींतल्या शालूचे कांठ विकण्याचें पाळी येते! बाहेर जाणाऱ्या लक्ष्मीचीं पावलें या अशा क्रमानें पडत असतात.

**अक्का०**—खरेंच ताई, तुला मी विचारतें, हा दरिद्री धैर्यधर तुला कसा आवडला? आश्चर्य आहे बाई! माझ्या लग्नाचे वेळीं दोघी बहिणींचीं लग्नें एकदम व्हावीं म्हणून लक्ष्मीधर जहागीरदारांना तुला देण्याचें ठरविलें—

**चंपा**—त्या वेळीं अक्कासाहेबांच्या विलासधरजींच्या इतके लक्ष्मीधर श्रीमंत नाहींत म्हणून ताईसाहेब रुसून बसल्या आणि तें लग्न मोडलें!

**विनो०**—विलासधरजींचें उत्पन्न पंचवीस लाखांचें आणि लक्ष्मीधरजींचें उत्पन्न चोवीस लाखांचें; ताईसाहेब, त्या वेळीं ही एक लाखाची तफावत आपणास सोसवली नाहीं! आणि आतां ज्याला रानांत शेत नाहीं आणि गांवांत घर नाहीं, अशा धैर्यधरजींच्या गळ्यांत माळ घालून दरसालची सबंध पंचवीस लाखांची तूट आपण कशी सोसणार? मी साफ सांगतों, वडील बहिणीमध्यें आणि धाकट्या बहिणीमध्यें इतकें पंचवीस लाखांचें अंतर मजसारख्या तिऱ्हाइताला देखील पाहवणार नाहीं!

**माल०**—कां ताईसाहेब, असें तोंडसें फिरविलें? सांगा, आपल्या पतिराजांचें उत्पन्न किती लाखांचें आहे तें सांगा, आणि करा या विनोदाचें तोंड बंद.

**भामि०**—कोणाचा ग पतिराज म्हणतेस? त्या धैर्यधराशीं मी थोडीच लग्न लावणार आहें? मीं मघांशीं तुम्हांला सांगितलेंना एकदां, त्या दरिद्र्याशीं मी लग्न करणार नाहीं म्हणून; तरी आपलें धैर्यधरजी तुझा पतिराज हें तुमचें तुणतुणें कायम आहेच! आज सकाळीं बाबांना जें मीं सांगितलें तेंच मी अक्का, पुन्हा तुला सांगतें—

[ पद ७—" प्रभू उडुगण गिनत " या चालीवर. ]

**धनी मी पति वरिन कशी अधना। पति जरि अधन निधन-सम मानी भामा विफल इतर सुगुणा ॥ ध्रु० ॥ प्रखर परा-क्रम वीर भानु भुलवित उषा रक्तवदना। तोचि निकट मग जातां जाळी तिजला ऐशी भीति मना ॥ १ ॥**

[ जाते.

**कुसु०**—हें काय, ही तर रागावून निघून गेली! बाबासाहेबांनीं मला सांगितलें होतें, धैर्यधरजी ज्या वेळीं देवीच्या दर्शनाला येतील, त्या वेळीं भामिनीनें देवीचा प्रसाद म्हणून देवीच्या अंगावरील फुलांची माळ धैर्यधरजींच्या हातांत टाकावी.

( ७ ) बिहाग, त्रिताल.

प सां——नी म प म् ग प म् ग री सा रे सा——
ध नीऽ मी प ति व रि न क शीऽ अ ध नाऽ

नि सा ग म् प प प प नी ध रे सां नि ध प——
प ति ज रि अ ध न नि ध न स म मा ऽ नीऽ

प——नी सां गं रीं मं गं रीं नी सां नी पमप
भा ऽ मा ऽ वि फ ल इ त र सु गु णाऽऽऽ ॥ ध्रु० ॥

प प सां सां सां——सां सां नी——सां नि ध प——
प्र ख र प रा ऽ क्र म वीऽऽ र भा ऽ नु ऽ

म प नी ध नी सां नी प ध ग म् ग——
भु ल वि त उ षा ऽ र क्त व द नाऽऽऽ

नी सा ग म् प म पप नी ध नी सां निध म प——
तो ऽ चि नि क ट मग जा ऽ ता ऽ जा ऽ ळी ऽ

प प सां——सां गं मं गं सां——नी प नी (सांगंरेंसानिधपमगरेसा)
ति ज ला ऽ ऐ ऽ शी ऽ भी ऽ ति म ना ऽऽऽ ॥ १ ॥

*Sow. T. K. Maruti Bai*



**अक्का०**—हो, हा तर आमचा कुलाचार आहे. माझ्या लग्नाचे वेळीं याच हिषासुरमर्दिनीच्या मंदिरांत सीमंतपूजनाचा समारंभ झाला, त्या प्रसंगीं ीच्या दर्शनाला जेव्हां तिकडून यायचें झालें, तेव्हां प्रसाद म्हणून मांही ांचो माळ तिकडच्या हातावर टाकली होती. पण काय ग कुसुम, आज धैर्य-जींचें सीमंतपूजन नाहीं, कांहीं नाहीं, मग आतांच कशाला हवी मिनी येथें ?

**कुसु०**—सीमंतपूजन उद्यां आहे, पण आमच्या या नगरींत येऊन घोड्या-न खाली उतरावयाचें तें प्रथम महिषासुरमर्दिनीचें दर्शन घ्यावयाचें, असें धरजींनीं ठरविलें; आणि पहिल्या दर्शनाचे वेळीं प्रसाद देण्याचे निमित्तानें नी पतिपत्नींची दृष्टादृष्ट व्हावी म्हणून बाबासाहेबांनीं आजच भामिनीनें ाद यावा असें मला सांगितलें. (पडद्यांत शिंगें वाजतात.) अग बाई, धैर्यधर-ची स्वारी आली वाटतें ! अक्कासाहेब, तुम्ही आतांपर्यंत भामिनीची केलीत ठा थट्टा पुरे झाली. आतां चला माझ्या बरोबर; भामिनीची समजूत करून जवळ तर तिला आणून उभी केली पाहिजे ना ?

**अक्का०**—गडे कुसुम, तूंच एकटी जा. भामिनी माझें ऐकेलसें मला कांहीं त नाहीं. माझ्या बोलण्यानें ती उलटी अधिक रागावेल मात्र.

**माल०**—कुसुम, तूंच जा एकटी समजूत करायाला.

**विनो०**—भामिनीनें धैर्यधराशीं लग्न करावें असें अक्कासाहेबांना वाटतच ीं; मग त्या ग कसली समजूत करणार ? त्यांना भामिनीची समजूत करा- । चला म्हणण्यापेक्षां, धैर्यधराला आल्या पावलीं दारांतूनच परत जा, असें ाणें अधिक बरें नाहीं का ?

**कुसु०**—भामिनीचें लग्न मोडायचें आहे वाटते अक्कासाहेबांच्या मनांत मंडप घातला, नवराही आला, आणि लग्न झालें नाहीं, तर बाबासाहेबांना तोंड तरी बाहेर काढूं देतील का ?

**अक्का०**—त्याच मंडपांत त्याच मुहुर्तावर भामिनीचें लग्न होईल, समज- कुसुम. मी आतां उघड सांगतें, त्या भिकारड्या धैर्यधराशीं भामिनीचें लग्न ां कामा नये, एवढीच काय ती आमची खटपट.

**कुसु०**—दुसरा एखादा नवरा मुलगा पाहून ठेवला आहे वाटतें !

**चंपा०**—पहायचा काय, लक्ष्मीधरजींना विलाधरजींनीं बरोबर आणलेंच आहे.

**माल०**—एक लाखानें उत्पन्न कमी म्हणून पूर्वीं मोडलेलें लग्न आताच्या मंडपांत उरकून घेतलें म्हणजे झालें.

**अक्का०**—हा दरिद्री धैर्यधर उगीच मधल्यामध्यें नवरा मुलगा होऊन उभा राहिला आहे. या आगांतुकाचें सोंवळेंभांडें बाहेर फेंकून द्यायला तूंही कुसुम आम्हांला मदत केली पाहिजे.

**विनो०**—आज काल मी पाहतों आहे, जेथें तेथें प्रतिष्ठित आगांतुकांचाच सुळसुळाट अधिक झाला आहे. दोन जिभा कांहीं चाखत असल्या म्हणजे तिसरी जीभ न बोलावतां हजर; दोन डोळे एकमेकांशीं भिडले कीं तिसऱ्या डोळ्याची पाळद तेथें आहेच म्हणून समजावें; दोन कान जवळ आले म्हणजे भिंत देखील आगांतुकी करून तिसरा कान मध्यें घालते ! अक्कासाहेब, या आगांतुकांचा बंदोबस्त करणें अगदीं जरूर आहे. या कामीं, कुसुम, तूं देखील मजप्रमाणेंच अक्कासाहेबांना मदत केली पाहिजेस.

**कुसु०**—मी नाहीं मदत करायची. मा अशी जाऊन भामिनीला सांगतें, लक्ष्मीधरजींची तळी उचलण्यासाठीं या नगळ्याजणी धैर्यधराची निंदा करीत आहेत ! सगळें नीट समजावून सांगतें, मग पहा देवांचा प्रसाद धैर्यधरजींच्या हातांत टाकायला ती आपोआप धांवत येईल. जाते.

**अक्का०**—विनोदा, तूं तिच्या मागोमाग जा, आणि धैर्यधराची अशी निंदा कर कीं त्याच्याशीं लग्न करायचें भामिनीच्या मनांत कधीं काळीं येऊं नये.

**विनो०**—अक्कासाहेब, आपण निर्धास्त असा. मी धैर्यधराची यथेच्छ निंदा करतों; कारण त्याच्या घरचें अन्न खाण्याचा प्रसंग मजवर कधींच आलेला नाहीं. पाहूंदे तर खरें, माझ्यापुढें काय बोलते ती. [ जातो.

**अक्का०**—मालती, हें लग्न कसेंही करून मोडलेंच पाहिजे. मला नाहीं वाटत आमच्या ताईला एखाद्या गरीबाच्या घरीं सुख लागेलसें. लक्ष्मीधरजी आमच्या इतके श्रीमंत नाहींत हें खरें, पण चोवीस लाखांच्या उत्पन्नाचीं स्थळें तरी आज काल कोठें आहेत ?

**माल०**—ही पहा विलासधरजींची स्वारी आली.

**चंपा०**—बरोबर लक्ष्मीधरजीही आहेत.

**अक्का०**—लक्ष्मीधरजीसारखाच राजबिंडा वर आमच्या भामिनीला मिळाला पाहिजे. [ विलासधर व **लक्ष्मीधर** येतात.

**लक्ष्मी०**—नाहीं बोवा, आपण कांहीं असला भिकारडा नवरदेव कोणत्याही जन्मीं पाहिला नाहीं; आणि विलासधरजी, हा दरिद्री तुमचा साडू होणार हें मनांत आलें, कीं तुमची संगति तरी आमच्यासारख्या श्रीमंतांना चालेल कीं नाहीं अशी शंका उद्भवते !

**विला०**—हो बोवा असें झालें आहे खरें. त्या दरिद्याला मीं मिरवणुकीत पाहिलें, आणि लाजेनें माझी मान आपोआप खालीं वांकली !

**लक्ष्मी०**—हा दरिद्री धैर्यधर बाहेर सेनापती आणि घरीं साडू ह्या दोन पाल्यां-च्या कात्रींत तुम्हांला पकडणार ! सेनापती या नात्यानें आम्हां श्रीमंतांचा पावलोंपावलीं त्या दरिद्याकडून उपमर्द होत आहे तेवढा पुरे नाहीं का झाला ? मी जर तुमच्याप्रमाणें बाबासाहेबांचा जांवई असतों, तर साफ सांगितलें असतें, तसाच प्रसंग आला तर एक बहिणीच्या ऐवजीं दोन्ही बहिणींशीं मी एकटाच लग्न करीन, पण हा दरिद्र्याचा ब्याद तुमच्या घरांत नको. विलास-धरजी, तुमच्या श्रीमंतीला लागूं पाहणारा हा जन्माचा कलंक तुम्ही कसा धुवून टाकणार, सांगा पाहूं.

**विला०**—ऐकलेस, तुझ्या बहिणीचें धैर्यधराशीं लग्न होणार, असा गांवांत पुकारा झाल्यापासून प्रत्येक श्रीमंत मनुष्यानें मला अशीं नांवें ठेवण्यास सुर-वात केली आहे. लक्ष्मीधरजी, हा कलंक कायमचा लागणार, अशी मला भीति वाटूं लागली आहे.

**अक्का०**—इतकें कांहीं भ्यायला नको. आम्हीं सगळ्याजणींनीं ताईच्या मनांत खूप भरवून दिलें आहे. फार झालें तर देवांचा प्रसाद घ्यायला आज ती पुढें येईल, पण परवा बोहोल्यावर भामिनी कांहीं उभी नाहीं, हें खास समजा. पण लग्नाचा मुहूर्त मात्र वायां जाऊं द्यावयाचा नाहीं.

**विला०**—मुहूर्त नाहीं वायां जायचा म्हणा; लक्ष्मीपुत्र लक्ष्मीधरजी आयत्या वेळीं धैर्यधरजींच्या जागीं उभे राहतील बोहोल्यावर; कां लक्ष्मीधरजी, असेंच ना ?

**लक्ष्मी०**—मी हजर असलों म्हणजे कोणाचें कोठें कांहींही नडूं द्यावयाचा नाहीं. अहो तसाच प्रसंग पडला तर दोन-तीन-असतील नसतील तितक्या

बहिणीशीं लग्न लावण्याचा माझा हिय्या मीं नुकताच ज़ाहिर केला नाहीं का? त्या दरिद्र्याची खोड मोडण्याकरितां आणि आपणां सर्वांचा तसाच आग्रह असेल तर मी आपला शब्द कांहीं खालीं पाडणार नाहीं. अहो, नइं दिलें तर सर्व श्रीमंतांचा मी म्होरक्या कसला? नइं द्यावयाचा नाहीं, कांहीं काळजी करूं नका. विलासधरजी आपणाला, मला, व इतर सर्व लक्ष्मीपुत्रांना त्या भिकारड्या धैर्यधराच्या हुकमतीखालीं रणांगणावर वागण्याचा हुकूम जेव्हां पृथ्वीधर महाराजांनीं केला, तेव्हां कोणच्याना कोणच्या तरी कामीं याची पुरी फजिती उडवावयाची, असा कट आपण सर्वांनीं मिळून केला नाहीं का? तुम्ही सर्वजण नको नको म्हणत असतांना, नइं नये म्हणून, मी आपण होऊन या कटाचा म्होरक्या झालों नाहीं का?–उगीच नाहीं म्होरक्या झालों?–केला, आजपासूनच फजिती उडवायला आरंभ केला. सांगा पाहूं, माझ्या या दागिन्यांमुळें त्याची आज थोडीशी तरी फजिती झाली कीं नाहीं?

**विला०**—अहो थोडी का, चांगली फजिती झाली!

**चंपा०**—आज त्या मेल्याची कशी फजिती झाली?

**विला०**—तो जर शहाणा असेल तर आजच्या फजितीनें आपणच होऊन लग्नाचा नाद सोडून देईल.

**लक्ष्मी०**—मिरवणुकींत त्यानें हे दागिने पहिल्यांदा जेव्हां पाहिले तेव्हां लगेच तोंड फिरविलें. मला वाटलें अशी फजिती झाल्यामुळें स्वारी तेथूनच पळ काढायच्या रंगांत आहे. पण पक्का निगरगट्ट! मी मिरवणुकींत म्होरक्याप्रमाणें सर्वांच्या पुढें चाललों होतों तरी तसा माझ्या मागोमाग येत होता!

**भामि०**—त्या मेल्याची आज कशी फजिती झाली?

**विला०**—फजिती म्हणून काय विचारतां? लक्ष्मीधरजींच्या अंगावरील या वेळच्या श्रीमंतीकडे पहा म्हणजे तुमच्या ध्यानांत येईल. असलें पाणीदार टपोरें मोतीं व निवडक हिरे कोणाही लक्ष्मीपुत्रापाशीं नाहींत. आणि या असल्या हिऱ्यामोत्यांच्या पुतळ्या शेजारीं रस्त्यांतील धुळीचें तें बाहुलें चाललें असतांना त्याची फजिती झाल्यावांचून कशी राहील?

**लक्ष्मी०**—माझे हे अंगावरचे दागिने पाहून सर्व लोक मलाच नवरदेव समजूं लागले! एक दोघांनीं तर मजकडे बोट दाखवून खुद्द धैर्यधरजीलाच विचारलें, नवरदेव ते हेच कां? अशी फजीती झाली, यंव रे यंव! त्या फजीतींतून

धैर्यधर डोकें काढतो व काढतो तों एका सज्जांतील स्त्रिया त्याकडे बोट दाखवून म्हणाल्या, नवरदेवानें इतका भिकारी हुजऱ्या कोठून आणला ? आणखी आतां फजीती व्हायची काय राहिली आहे ?

**अंका०**—बरें झालें, त्याची या मिरवणुकींत पुरी फजीती झाली, हें चांगलें झालें. दरिद्री तो दरिद्री आणि आमची ताई म्हणे त्याला बायको पाहिजे ! अशी खोड या दरिद्र्यांची मोडली पाहिजे. नाहींग बाई ह्या दरिद्र्याच्या घरीं भामिनीला सुख लागणार नाहीं.

**विला०**—सुख कसचें लागणार ?

[ पद ८—" मारिकोल्लुवेणु " या चालीवर. ]

**सेवि रविकरा शीत पुष्प राशीपरि । त्याला कमल-माला अनल झाला तो तिज करिं ॥ध्रु०॥ घोर असा वरचि गमत मुकुलमृदुल चारु दिसत भामा मानिल लग्न मृत्यू ही चिंता मज खरि ॥ १ ॥**

**लक्ष्मी०**—हो असें लग्नाशिवाय रहाणार नाहीं. मुखासारखा कमरेला तलवार बांधून लग्नाला आला आहे ! नवऱ्या मुलीला तलवारीच्या धारेवर काय बळी द्यायची आहे ! नवरदेव म्हणून आला तर एखादा तरी दागिना अंगावर नको होता कां ?

---

( ८ ) पद—दादरा.

ग–प ध सां ध सां——— सां–सां नी–प ध नि प (धपम्)ग रे
सेऽवि र वि क रा ऽऽऽऽऽ शीऽ त पुऽष्प रा ऽशि ऽ प रि
* – ० * – ० * – ० * – ०
गं गं—रें सां ध रें रें – सां ध प ध ध–प ध प मृगरे–
त्या ला ऽ क म ल मा ला ऽ अ न ल झा ला ऽ तो ऽ तिज करिं॥ध्रु०॥
* – ० * – ० * – ०
ग——प ध सां– सां सां रें सांसांसां प नीध नि रें रें सांरेंसां धधप
घो·ऽ र अ सा ऽ व र चि ग म त मु कु ल मृ दु ल चा ऽ रु दिसत
गं गं– रें सां ध रें रें – सां ध– ध ध– प ध– पमृगरे
भा मा ऽ मा नि ल ल ग्ना ऽ मृ त्यू ऽ ही चिं॰ऽ ता ऽ मजखरि ॥१॥

[ पद ९— " कोमलांग ताळकुंन्नडिद " या. चालीवर. ]

**भाग्यहीन भामिनी खरी। नवरदेव परि मणि न मलिनही शिरीं ॥ ध्रु० ॥ नकार धनासि भिकार जणु धरी, हिरा नच दिसत न वा कनककण न वा रजतलवही, मलिना अधना कोण वरी। याचनेसि जणु येत धनारी ॥ १ ॥**

**आक्का०**—खरेंच कां बाई त्याच्या अंगावर एक फुटका मणिदेखील नाहीं ?

**माल०**—इश्श ! त्याचा गळा खरोखर ओकाबोका आहे का ?

**चंपा०**—इश्श ! बोटांत एक देखील अंगठी नाहीं का ?

**चिला०**—खरें आणि खाटें, ता पहा धैर्यधरच बाबासाहेबांच्या बरोबर येत आहे. पाहून घ्या त्याचा गळा मोकळा आहे की नाहीं तो !

---

( ९ ) ( चाल—कोमलांग ताळकुंन्नडिद, धुमाळी. )

सां' सां– प पध– प ग मृग ग रे सा– रे ग सा————
भा ऽऽ ग्य हीऽऽ न भा ऽऽ मि नी ऽऽ ख री ऽऽऽऽऽऽऽ
* – ० – * – ० – * – ० –

रे' गं रे' सां– प नी सां रे' गं रे' सां नी प नी सां रे'————
न व र दे ऽ व प रि म णि न म लि न हि शि रीऽऽऽऽऽऽऽऽ
* – ० – * – ० – * – ० –

(गंमृगं) (रे'गंरे') (सांरे'सां) (नीसांनी) ध प रे'– सां—
ऽऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽऽ ऽऽ ऽऽ ऽऽ
* – ० – * – ० –

गं रे'– सां रे' सां– प ध प– ग ग रे ग प
न का ऽ र ध ना ऽ सि भि का ऽ र ज णु ध रि ॥ ध्रु० ॥
* – ० – * – ० –

गं रे'–सां नि पसांसां गं रे'–सांनीप नीसां गं रे'–सांनीप निसांरे'–
हि रा ऽ न च दिसत न वा ऽ क न क कण न वा ऽ रजत लव ही ऽऽऽऽऽऽऽ
* – ० – * – ० – * – ० – * ० – ० –

सां गं सां–सां रे' सां–पनीसां रे' सां— गं–रे' सां–सां प प
म लि ना ऽ अ ध ना ऽ कोऽण व री ऽऽऽ याऽ च ने ऽ सि ज णु
* – ० – * – ० – * – ० –

ध—प ग ग—प ध
ये ऽ त ध ना ऽ री ऽ ॥ १ ॥
* – ० –

लक्ष्मी०—अगोदर माझ्या हातांतील आंगठ्यांवर दृष्टी फेका, नंतर त्यांचीं बोटें न्याहाळा; त्याचे बुंच्चे कान लक्ष्यांत घ्या आणि नंतर माझ्या चिकबाळीचा कान धरा मनांत; म्हणजे मग श्रीमंतांत आणि गरीबांत किती अंतर असतें हें तुम्हांला समजेल.

विला०—पाहून घ्या हातात सलकडें, पोची, कांहीं आहे ?

चंपा०—इश्श ! खरेंच बोटांत एक देखील आंगठी नाहीं ! कुत्रें देखील ज्या हाडकाला चघळणार नाहीं असल्या हाडकासारखीं बोटें रुक्ष दिसतात !

माल०—इश्श ! खरेंच गळा मोकळा आहे. एखाद्या विधवेच्या गळ्या-सारखा अपशकुनी दिसतो बाई !

अक्का०—इश्श ! खरेंच डोक्यावर तुरा नाहीं ! धुळीनें मळलेला याचा मंदील तुरा नसल्यामुळें बिनशेंडीच्या संन्याशाच्या डोक्याप्रमाणें अगदीं हिडिस दिसतो ! नाहीं ग बाई माझी ताई कशी सोन्यासारखी आहे, त्याची बायको नको व्हायला. [ बाबासाहेब, धैर्यधर, व शीलेश्वर येतात. ]

धैर्य०—बाबासाहेब, मी घाई करतों त्याचें कारण दुसरें तिसरें कांहीं नाहीं. आजच खबर आली आहे, उत्तराधिपती सांप्रतचा दोन महिन्यांचा तह मोडून आमच्या छावणीवर छापा घालण्याच्या तयारींत आहे. शत्रूनें आमच्या छाव-णीवर छापा घालावा आणि मी इकडे लग्नसोहळ्यांत गुंग असावें, हें केव्हांही चांगलें होणार नाहीं. म्हणून म्हणतों, उद्यांचें उद्यां लग्न आटपून मला छावणीकडे परत जाऊं द्या.

बाबा०—नाहीं हो, दोन दिवस रहा, छावणीकडे कांहीं गडबड व्हायची नाहीं.

विला०—दोन महिन्यांकरितां लढाई बंद ठेवण्याचा तह झाला आहे ना ?

शील०—मनांत आणलें म्हणजे तह पाहिजे तेव्हां कोणालाही मोडतां येतो. उत्तराधिपती तह मोडणार, अशीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत. कारण दरवडे-खोरांची सोंगें घेऊन शत्रूनें तह केल्यावरही चार पांच ठिकाणीं लुटालूट केली आहे.

लक्ष्मी०—उत्तराधिपती कांहीं इतका कंगाल लागून गेला नाहीं, लढाई जुंपायला दीड महिना अवकाश असतांना आजच आपण होऊन लढाईला पुन्हा सुरवात करील म्हणायला.

शील०—अहो हा लढाईतील डावपेंचाचा प्रश्न आहे. येथें श्रीमंतीं आणि गरीबी कसली घेऊन बसलांत?

लक्ष्मी०—श्रीमंतीवर लढाईतील ब-याच-ब-याच का मगळ्या—गोष्टी अवलंबून असतात. गरीबांना अंत:पुर नाहीं, सुखसोहाळे नाहींत, आणि शरीराची मिजासही नाहीं. तेव्हां त्यांना दिवसभर जरी लढाई चालली तरी रात्रीही पुन्हा तशी चालू रहावी असें वाटणें साहजीक आहे. पण श्रीमंतांची गोष्ट निराळी! श्रीमंत रात्रा गरीबाप्रमाणे निरुद्योगी नसतात; आणि रात्रीचे उद्योग निस्तरण्याकरितां दुस-या दिवशीं सूर्य अस्तास जाईपर्यंत त्यांना झोंप काढावी लागते. सूर्य अस्ताला जातो आहे, रात्र पडते आहे, याच्या दरम्यान, घडी, अर्धीघडी, पावघडी, लढाई करणें आम्हासारख्या श्रीमंतांच्या प्रकृतीला मानवतें. हे श्रीमंतीचे वांक शत्रूकडील सर्व सरदारांना माहीत आहेत. झाप्याची कल्पना दरिद्र्यांनाच सुचायची. म्हणून म्हणतों उत्तराधिपती उद्यांपासून लढाई सुरू करील, असें मला देखील वाटत नाहीं!

विला०—खळ पडूं न देतां एकसारखी धडपड करणें, हे कांहीं श्रीमंतीचें लक्षण नव्हे.

लक्ष्मी०—मी सांगतों ना, मी जर शत्रूचा सेनापति असतों तर दोन महिन्यांच्या ऐवजीं दोन वर्षांची सुट्टी घेतली असती.

शील०—आमच्या पृथ्वीधर महाराजांचें नशीब थोर म्हणून त्यांना असले सेनापति नेमण्याची बुद्धि झाली नाहीं. बाकी चार दिवस सेनापतिसाहेबांनीं माझ्या मतें येथें काढावयास कांहीं हरकत नाहीं.

धैर्य०—तुम्ही कांहीं म्हणा, माझें मन कसें छावणीकडे धाव घेत आहे. बाबासाहेब, सांप्रतच्या लढाईत तनमनधन सर्व तऱ्हेनें आपण मला मदत करीत आहात, तेव्हां रणांगणाकडे परतण्याच्या माझ्या उत्साहाचे आड आपण विनाकारण याल, असें मी कसें म्हणूं? मी श्रीमंत नसतांना आपण मला आपली मुलगी देऊं केलीत, आणखी माझ्या लढाईच्या हौसेचा आपण गौरव तो काय करणार! हें सगळें खरें असलें तरी आपण माझें एवढें ऐकाच, उद्यांचें उद्यां लग्न आटपून परवां मला छावणीकडे परत जाऊं द्या.

**बाबा०**—याचा विचार उद्ईक सकाळा करूं. आता आपण थकून येता आहां; माझी मुलगी भामिनी, आपली भावी पत्नी, या वेळा आपणाला या महिषासुरमर्दिनीचा प्रसाद देईल; नंतर आपण थोडा वेळ विश्रांति घ्या. पुढचा बेत उद्ईक शांतपणे सकाळा करूं. ए अक्का, अग चंपे, ए मालती, भामिनी येथे दिसत नाहीं ? जा, बेटा जा, तिला लवकर ये म्हणावें. [ अक्का, माल०, चंपा जातात. ] आपण देवीचें दर्शन घेईन होतें, इतक्यांत भामिनी येऊन आपणाला प्रसाद देईल.

**धैर्य०**—( देवीला नमस्कार करून ) बाबासाहेब, हुबेहुब हेंच दर्शन मला पूर्वी घडलेलें आहे !

**बाबा०**—आपण तर या मादगा... प्रथमच आज याय देवींत आहां, आणि हें दर्शन आपणाला कोठें घडलें ?

**धैर्य०**—

[ पद १० ' ... ' या चालीवर. ]

**आता दिसली समरीं विहरत. नत सकल असुर रणासि ॥ ध्रु० ॥ मस्तकमाला गुंफित कालमहेश्वरपातिस्वेच्छेसि ॥ रणासि ॥ १ ॥ शिकवित भक्ता रणलीला ऊणुं भीषणयुद्धकलासि ॥ रणासि ॥ २ ॥**

१० सिंधुरा- त्रिताल.

नि—सा—नि ध प — रे म (पधप) रेगरेसा ग — र मा ग म प ध
म ऽ । ऽ [illegible] ऽ म ग ऽ [illegible] ऽ [illegible]

नी—सा रे नि—म प
वं ऽ र सा ऽ सि ऽ ॥ ध्रु० ॥

म—पध नी—सा—रें गं रें सां रें नीं मं नि ध—मम गम पधनी सां रें
म ऽस्तक मा ऽलाऽ गुं ऽ [illegible] का ऽ ल म हे ऽ श्वर प तिस्वे ऽ च्छे ऽ सि र

नि—मप
णा ऽ सिऽ ॥ १ ॥

[ पुढें चालू

**लक्ष्मी०**—( विलासधराशीं एकीकडे ) काय गप्पा मारता आहे ! यानें म्हणे लढाईंत प्रत्यक्ष महिषासुरमर्दिनी पाहिली ! हे गरीब लोक द्रव्याची उणीव ओकदार शब्दांनीं भरून काढतात. ( उघड ) काय आपणाला प्रत्यक्ष दर्शन झालें अं !

**धैर्य०**—रणांगणावर प्रत्यक्ष महिषासुरमर्दिनीचें दर्शन कोणाला होणार नाहीं ? यांत आपल्याला आश्चर्य कसलें वाटलें ! अहो, रणांगणावर नेहमीच देवता संचार करीत असतात.

[ पद ११–" मोरि कर पकरत गई बंगरी. " या चालीवर ]

**रण गगनसदनसम अमरा ! शरचपला चमकत, रण-**
**रत नर प्रियकर जलधर समजत जल रुधिरा ॥ ध्रु० ॥**
**देववदन दिसत सतत समरीं, धरी सुरगण विजया निज-**
**करीं, पुण्ययोग समर खचित बहु सुलभ नरा ॥ १ ॥**

म् म् पधनी—सां—रें गं रें सां रें नी सां सां नि् ध म् म् ग म् प
शि क वि त भ ऽ त्ता ऽ र ण लीं ऽ ला ऽ ज णुं भी ऽ व ण चु ऽ द

ध नी—सां रें नि्—म् प
क ले• ऽ सि ॥ र णा ऽ सि ऽ

११ मात्रा—त्रिताल.

ग् म् प नि् प सां नि् प ग् रें नि् सा ग्—प प ग् म् प —नि् नि् म् प
र ण ग ग न स द न स म अ म राऽ श र च प लाऽ च म क त

नि् नि् म् प नि् सां ग् सां म् ग् सां नि् ग् सां नि् प म् प सांनि्(पम्)प ग्—
र ण र त न र प्रि य क र ज ल ध र स म ज त ज ल रु धि राऽ

॥ ध्रु० ॥

प—प प ग् म् प नि् प नी नी नी सां नी सा-ग्सां ग् नि्सां पम् प ग्-
देऽ व व द न दि स त स त त स म रीऽ ध रि सु र ग णवि ज याऽ

[ पुढें चालू

**बाबा०**—अग भामिनी, अग भामिनी, आली का भामिनी ? कुसुम, भामिनी कोठें आहे ?

**कुसु०**—( पडद्यांतून ) बाबासाहेब, ही भामिनी येथें दाराआड उभी आहे. आपण बोलवा म्हणजे येईल पुढें.

**बाबा०**—( दाराजवळ जाऊन ) भामिनी, इतकें कांहीं लाजावयाला नको; ये अशी बाहेर.

**( पडद्यांत )**— " नाहीं, मी साफ येणार नाहीं. पुन्हां सांगतें मी साफ येणार नाहीं. "

" **धनी मी पति वरिन कशी अधना ! पति जरि अधन**
**निधन मम मानीं भामा विफल इतर सुगणा !** "—

[ हें पूर्वोक्त भामिनीचें भाषण. ]

**बाबा०**—काय पोरीला वेड लागलें आहे ! धैर्यधरजी, मी आतां जाऊन घेऊन येतों तिला. असले वेडेचार चालूं देतां कामा नयेत. माझें कसें ऐकत नाहीं पहातों.

**धैर्य०**—बाबासाहेब, आपण असा त्रास करून घेऊं नका. तिची जर इच्छा नसली तर उगीच जुलमाचा रामराम तिच्याकडून कशाला करवितां ? शिवाय झालें हें एका तऱ्हेनें बरेंच झालें. कारण छावणीकडे तावडतोब परतण्याला आतां हरकत नाहीं. महिषासुरमर्दिनीचें दर्शन म्हणजे युद्धाची सूचना; असें दर्शन झाल्यावर लग्नाला बोहल्यावर चढण्यापेक्षां छावणीकडे एकदम परतणें हेंच योग्य. [ जाऊं लागतो. ]

म् ग् रे सा प—प ग्—म् पनि् प नि् सां सां नि्सां म् ग् सां
नि ज क री पु ऽ ण्य यो ऽ ग म म म र स चि न ब हु मु ल भ

सां (.नीं सां न् ग् सां नि्पम् ग् रे )
न रां ऽ ऽ ऽ ॥ १ ॥

**बाबा०**—नका हो, जरा थांबा, मुलगी अल्लड आहे, असा राग करूं नका, मजकडे पहा, रागावूं नका, हा अपमान मी भरून—

**धैर्य०**—मला राग आला नाहीं व यांत मी अपमानही समजत नाहीं. पण मला तुमच्या मुलीशी लग्नच कर्तव्य नाहीं. कारण—

[ **पद १२**–" असा हरी रास. " या चालीवर. ]

**अनार्या खास तो समजा। न गणित जी स्वपतिमनपूजित नरवरवरित देवकार्या ॥ ध्रु० ॥ पुरुष धनुर्धर संसाररथा, सारथिसम भार्या। उलट जरी रथ चाले, येत मरण शौर्या ॥ १ ॥** [ धैर्यधर व शीलधर जातात.

**बाबा०**—विलासधरजी हे रागावून गेले ! चला, आपण त्यांचें शांतवन करून त्यांना परत आणूं. [ जातो.

**लक्ष्मी०**—जाऊं दे त्याला छावणीकडे. विलासधरजी, तुम्ही कशाला जाता त्यांच्याबरोबर. चला तुम्ही मजबरोबर. मी आतां बोहोल्यावर तुम्हा धरणार. भामिनी लग्नमंडपांत आली कीं चढलो बोहोल्यावर.

[ **प्रथम अंक समाप्त.** ]

१२ काफी—त्रिवट.

प ध म् धप सां—ध प म् ध प ग् —रे रे ग् सा रे नासा प
अ ना ऽ र्या ऽ खाऽऽस ना ऽ म म जा ऽऽ ऽ न ग णि त जी ऽऽ स्व

प प म् ग म् ध प नि् ध प म् ग म् ध प(धनींसां)ध नि्प ध म् प
प ति म न पू ऽ जि त न र व र व रि त दे ऽ व काऽ र्या ऽ ऽ ॥ध्रु०॥

म् नि ध नि् सां मां सा रे ग रे मांसां नींसां—रें गं रें सां नीं सां नि् ध
पु रु ष ध नुऽर्ध र सं ऽ सा ऽ र र था ऽ सा ऽ र थि स म भा ऽ

ध (नि्प) प रें सां रें नीं सा नि् ध नि ध नि्प प ध नीं सां ध नीं
र्या ऽ ऽ ऽ उ ल ट ज री ऽ र थ चा ऽ ले ऽ ये ऽ त म र ण

ध सां नि् ( ध प म् )
शौ ऽ र्या ऽ ऽ ॥ १ ॥

# अंक २ रा.

## [ प्र० १ ला. ]

स्थळ—विलासधराचा तंबू.

[ **विलासधर** व **विनोद** येतात. ]

**विनो०**—महाराज, माझी एवढी विनंती ऐकाच; आणि माझ्या मागची ही पायपीट चुकवा. अहो, आज ह्या छावणींत तर उद्यां त्या छावणीत, असें भामिनीताईसाहेबांबरोबर फिरतां फिरतां अगदीं पुरे वाट झाली आहे! तेव्हां म्हणतों, कांहीं तरी युक्ति काढा, आणि भामिनीताईसाहेबांचें लग्न लक्ष्मीधरजींशीं लावून टाका. म्हणजे ताईसाहेबांबरोबर रणाङ्गण तुडविण्याची ही यातायात तरी चुकेल. या ठिकाणीं मोठी लढाई झाली, आणि धैर्यधरजींनी पराक्रम येथेंच गाजविला, असें कोणी सांगितलें, कीं प्रहरानुप्रहर तेंच रणमैदान पहात त्या उभ्या रहातात!

**विला०**—भामिनीला धैर्यधराच्या पराक्रमाच्या गोष्टी सांगतो तरी कोण

**विनो०**—रणांगणावर या गोष्टी कोणी कोणाला सांगाव्या लागत नाहींत. जरा इकडून तिकडे फिरलें म्हणजे आपोआप ऐकूं येतात.

**विला०**—खरें आहे; म्हणूनच भामिनीनें एक महिना रणाङ्गणावर काढावा आणि नंतर पाहिजे तर लक्ष्मीधराशीं लग्न करावें, असा बाबासाहेबांनीं हट्ट धरिला. आतां आली माझ्या ध्यानांत बाबासाहेबांची युक्ति, धैर्यधरजींचे गुणानुवाद एकसारखे भामिनीच्या कानीं कपाळीं पडावेत, म्हणून त्यांनीं तिला येथें पाठविलें! आणि काय म्हणतोस, धैर्यधरजींचा पराक्रम तिच्या मनांत भरूं लागला आहे?

**विनो०**—होय सरकार. आपण त्याच दिवशीं लक्ष्मीधरजींचें लग्न उरकून घ्यायचें होतें—

**विला०**—मी तसेंच करणार होतों, पण त्या बुड्ढयाच्या अंगांत आयत्या वेळी लढाईचें वारें शिरलेंना! त्यानें मोडा घातला; आणि पैशाचें महत्त्व अधिक का पराक्रमाचें अधिक, हें स्वत: पहाण्याकरितां भामिनीला त्यानें रणाङ्गणावर पाठवून दिली. ती कोठें राहिली आहे म्हणतोस?

**विनो०**—धैर्यधरजींच्या छावणीशेजारी कुसुमच्या बागेंत. कुसुमही बरोबर आहे. भामिनीताईसाहेबांनीं वनमाला असें नांव घेतलें आहे, आणि कुसुमनें पुष्पमाला असें नांव घेतलें आहे.

**विला०**—विनोदा, तुझें नाहीं का दुसरें नाव ठेवलें?

**विनो०**—म्हातारपणीं रंगरूपाप्रमाणें नांवही कायमचेंच होऊन बसतें. मला आतां अदलाबदलीची हौसच उरली नाहीं: पायांना मात्र एकसारखी जागा बदलावी लागते. तेवढी किटकिट नाहींशी करा म्हणजे झालें.

**विला०**—जा, तूं कांहीं काळजी करूं नको; मी त्याच उद्योगात आहे. भामिनीनें वनमाला नाव कसें धारण केलें आहे, बाबासाहेबांनीं सांगितल्याप्रमाणें छावणींतून ती गुप्तपणानें कशी फिरत असते, धैर्यधरजींकडे तिचें मन कसें झुकूं लागलें आहे, सर्व कांहीं मला पूर्वींच कळलें आहे, आणि या सगळयांचा बंदोबस्त मी लवकरच करणार आहें. जा तूं, कांहीं कमजास्त झालें तर मात्र मला ताबडतोब कळीव, जा. [ विनोद जातो.] ह्या लक्ष्मीधराचें आणि भामिनीचें लग्न व्हावें कसें? सगळ्या छावणींतून गुप्तपणें संचार करून जर भामिनीनें धैर्यधराच्या गळ्यांत माळ घातली, तर आम्हां सर्व लक्ष्मीपुत्रांच्या तोंडाला काळोखीच लागली म्हणायची! लक्ष्मीपुत्राच्या घरीं भामिनीचा जन्म, तिची थोरली बहीण मला–लक्ष्मीपुत्राला–दिलेली, लक्ष्मीधरासारखा लक्ष्मीपुत्र भामिनीला वरण्याला तयार, धैर्यधर गरीब म्हणून भामिनीनें त्याला एकदां झिडकारलेंही, आणि आतां जर का ती पुन्हा त्या भिकारड्याच्या घरांतच शिरली,–मग आम्हीं सर्व लक्ष्मीपुत्रांनीं जिवंत तरी कां रहावें? हजार खटपटी लटपटी केल्या पाहिजेत आणि भामिनी लक्ष्मीधरालाच– [ लक्ष्मीधर हातांत पेटी घेऊन येतो. ]

**लक्ष्मी०**—वरील असें झालें पाहिजे. व्हावयाचेंच तसें; त्यांत संदेह बिलकुल नाहीं. आणि आतांचा माझा हा पोषाख पाहिलांत म्हणजे तुम्हांला शंकाच राहणार नाहीं.

चिला०—नटलां आहां तर खूप !

लक्ष्मी०—मीं आरशांत जेव्हां हा माझा थाट पाहिला तेव्हां मला देखील वाटलें-

चिला०—काय वाटलें ?

लक्ष्मी०—मी भामिनी झालों असतों तर बरें झालें असतें ! मजकडे पाहून तुम्हांला नाहीं वाटत-भामिनी व्हावेंसें तुम्हांला नाहीं वाटत ? अहो, असला मजसारखा नटलेला नवरा मिळण्याची पर्वणी साधावी म्हणून, या जन्मीं नाहीं तर पुढल्या जन्मीं तरी, बायकांच्या जन्माला याल म्हणून सर्व पुरुष परमेश्वराची प्रार्थना करण्यास चुकणार नाहींत ! स्त्रीजातीची महती या असल्या थाटानें वाढून स्त्रीजात धन्य होणार असे उद्गार मजकडे पाहून सर्वांच्या तोंडून निघत असतील नाहीं ? तुम्हांला नाहीं असें वाटत ?

चिला०—मला कांहीं नाहीं वाटत. आतां ह्या सोंगाचा उपयोगच नाहीं. मीं तुम्हाला निरोप पाठविला होता तुमची ती तलवार बरोबर घेऊन या म्हणूनि, आणि ही पेटी कशाला आणिलीत ?

लक्ष्मी०—ही पेटी हिऱ्यामोत्यांच्या दागिन्यांनीं भरलेली आहे अहो भामिनीला वश करावयाला तलवार कशाला पाहिजे ! बायकांना हस्तगत करायला दागिन्यांचाच भडिमार केला पाहिजे.

[ पद १३—" पधपमगरिसा "–सुरावटीचे चालीवर. ]

**कनकरत हिरा अंगना भजती देवाहुनी, प्रिय नवरा। अलंकारचि बहु सुखद खरा ॥ ध्रु०॥ नटुनियां स्त्रिया गमती जणुं पेटी गतियुत रत्नधरा। साजे, मग समजा, बहु धन तें निज नवरा ॥ १ ॥**

खमाज-त्रिताल.

प ध प म् ग रे सा— ग रे ग म्— ग म् प—ध–ग–म् ध—
क न.क र त हि रा ऽऽ अं ऽ ग नाऽऽऽ भ ज ती ऽऽ देऽऽवाऽऽहु नीऽऽऽ
— ० — * — ० — *

[ पुढें चालू

अहो ही पेटी म्हणजे छोटी भामिनी समजा. मोठी भामिनी पाहिजे असेल तर ही छोटी भामिनी पुढें केली पाहिजे. मोठी आहे तेथें छोटी आहे, छोटी आहे तेथें मोठी आहे, असें हें त्रांगडें आहे. म्हणून दागिन्यांचा पुरवठा बरोबर ठेवला आहे. मग तलवार कशाला पाहिजे?

**विला०**—अहो भामिनी तुमच्या हातची गेली म्हणून समजा. विनोद नुकताच येऊन गेला; त्यानें देखील बातमी भलतीच आणली; म्हणून म्हणतों तुम्हीं तलवार—

**लक्ष्मी०**—भलतीच कोणती बातमी? भामिनीचें कांहीं—बरें वाईट—

**विला०**—तसें नव्हे. श्रीमंतांच्या जादूनें भामिनी इतक्या दिवस भारलेली होती. आतां पराक्रमही तिच्या डोळ्यांत जरा जरा भरूं लागला आहे! या वेळीं थोडेसें शौर्य दाखवून तुम्हीं जर लगट नाहीं केली तर भामिनी धैर्यधराकडे गेली, हें पक्कें—

**लक्ष्मी०**—पराक्रम दाखवूं म्हणतां? तें नाहीं आपल्याला जुळायचें. तुमचा लढाईचा निरोप पोंचला तेव्हां दहा वीस माणसें तलवार हुडकाव-याला लावलीं—

---

नि॒ ध प म॒ ग— ग ग म॒ प ध नि॒ प ध म॒ ध प म॒ ग रे गसा—
प्रि य न व रा ऽ ऽ अ लं ऽ का ऽ र चि व हु मु ख द ख रा ऽ ऽ ऽ ऽ

ग रे ग म॒
अं ऽ ग ना ऽ ऽ ऽ ॥ ध्रु० ॥

म॒ ग म॒ ध— नि॒ प—ध नी सा— नीसां— सां— गं— म॒ गं रें सां
न टु नि याऽ लि या ऽग म ती ऽऽ जणुं ऽ पे ऽ टीऽऽऽ ग ति यु त

सां—सां नि ध—म॒— ध—नि॒ ध प म॒ ग— ध प म॒ ग रे—
र ऽ त्न ध राऽसाऽ जेऽऽऽ म न स म जाऽऽऽ ब हु ध न तेऽऽऽ

पम॒गरेसा— गं ग म॒ प ध नि॒ प ध म॒
तिजनवराऽऽ अ लं ऽका ऽ र वि ब हु................ ॥ १ ॥

**विला०**—मग काय तलवार सांपडली देखील नाहीं

**लक्ष्मी०**—अखेरीस सांपडली ती.

**विला०**—मग आणली का नाहीं !

**लक्ष्मी०**—म्यानांतूनच बाहेर निघेना, गंजली आहे ! मी खूप खटपट केली. तेव्हां म्हणतों, तलवार दाखविल्याशिवाय जर भामिनी मिळत नसली तर येऊं दे तिला धैर्यधर. आपल्याला काय बायकांना तोटा ! ह्या पेटींतल्या एक एक दागिन्याला एक एक बायको मिळेल आहांत कोठें !

**विला०**—लक्ष्मीधरजी, तुमचें हे बोलणें ऐकून मला हसावें की रडावें कांहींच समजत नाहीं. अहो द्रव्याची योग्यता मोठी तर खरीच; पण आम्ही लक्ष्मीपुत्रांनी जर आमच्यांतल्या चांगल्या चांगल्या स्त्रिया दुसऱ्याच्या घरा जाऊं दिल्या, तर आम्हांला सोडून लक्ष्मीही कांहीं दिवसांनी दुसऱ्याच्या घरीं जाईल. प्रथम बायकांचा पाय बाहेर पडतो आणि नंतर लक्ष्मीचा पाय बाहेर पडतो. ज्याना लक्ष्मीचें जतन करावयाचें आहे त्यांनी बायकांना गमावतां कामा नये. लक्ष्मीहून बायकांची योग्यता अशी अधिक असल्यामुळें तर रामरावणा-सारख्यांनी युद्धें झालीं.

[ पद १४—" रामको आधार " या चालीवर ]

**रामरावणादि रणा जुंपिलें कर्में । कामिनीधनेंचि तया मोहिलें दिसे ॥ ध्रु० ॥ कामुका हिरा चमकत बहुत कनक खासें, अमररत्नसकलतेज सुंदरी धरीतसे ॥ १ ॥**

राग पिलू-ताल दादरा.

प—प प ध़ प गंम् ग सा ग(गम्पधपम्ग)ग् —ग् रि ग् री सा——
राऽम ग ऽ व णा ऽ दि र णा ऽ जुं ऽ पि ले ऽ क र्से ऽऽऽऽऽ
* — ४ ० । — ० * — ०

प —प (पधसांनी) ध(गंमंग)सा मा (गम्प)—ग्—रे रे ग रे सा———
का ऽमि नी ऽ ध नें ऽ चि त या ऽ मोऽ हिले ऽ दि से ऽऽऽऽऽ
* — ० ४ — ० * ० * — ०

॥ध्रु०॥

[ पुढें चालू

अहो, बायका आपणाला सोडून गेल्या म्हणजे सर्वच संपलें; लक्ष्मी जाते, परंपरा तुटते, संसार आणि समाज खरोखर क्षणभंगुर होतो. भामिनीप्रमाणें बायकांची वृत्ति चंचल होऊं न देणें, ह्यालाच जीवित म्हणतात; आणि एकदां का बायकांची वृत्ति चंचल झाली म्हणजे त्या पुरुषाची, त्या घराची, त्या समाजाची गठडी वळून नरक जवळ आला म्हणून समजावें. म्हणून म्हणतों, लक्ष्मीधरजी, भामिनीला आपल्या मंडळांतून बाहेर जाऊं देतां कामा नये. अहो, मग आम्हां लक्ष्मीपुत्रांचें महत्त्व काय उरलें?

**लक्ष्मी०**—भामिनीला वश करायला माझी ना नाहीं. पण माझें आपलें ठाम मत आहे; तलवारीपेक्षां दागिन्यांचाच ह्या कामीं अधिक उपयोग होतो; तुम्ही बायकांच्याकडे पुरुषांच्या नजरेनें पाहतां; मजप्रमाणें बायकांच्या दृष्टीनें भामिनीकडे पहा म्हणजे दागिन्यांचें महत्त्व तुमच्या लक्षांत येईल. स्वतःचें मन बायकी केल्याशिवाय बायकांचें कोडें उलगडतां यावयाचें नाहीं. तुम्हीं अशी कल्पना करा, कीं तुम्ही एक तरुणी आहां; आतां पहा ह्या पेटीकडे; (पेटी उघडतो) झालाच पाहिजे मनावर परिणाम! दागिन्यांच्या जादूचा अंमल चालला चढत तुमच्या डोळ्यांवर! आतां तुमचे डोळे बसले खिळून ह्या पेटींत!

म्‌—म्‌ प नी नीं सां— सां नीं सां— धनिध म्‌ ग म्‌ प धनि धंप—
काऽमु का ऽ हि राऽ च म कें ऽ ब हु त क न क खा ऽऽ मे ऽऽ
* ० * ० * ० * ०

नी नी नीं सां— नी नींसांरें नि ध प ध नि ध प—म्‌ ग—
अ न र र ऽ त्न स क ल ते ऽ ज मुं ऽ द् री ऽ ध री ऽ
* ० * ० * ० *

सा ( गम्‌पधप्‌म्‌ग ) ग——ग री
न से ऽ ऽ जुं ऽ पि ले ...... ॥ १ ॥
० *

[ पद १५ -" यार के घर चल जाये " या चालीवर. ]

**साम्यसम जुळतसे सुगत दिसतसे सममना ॥ ध्रु० ॥**
**नव धन सहज मिळत धनवाना. धनजा महिला धनमन माना । वश युवती युवगणा सुंदर जना रूपमोहना. रसिक अंगना विलसना ॥ १ ॥.**

आतां सांगा पाहूं, माझा उपाय खरा का तुमचा. उपाय खरा ! ही आपली मुद्रा, हे उसासे, काय सांगत आहेत ? स्वतःवरून जग ओळखावें. तुमच्यावर जर इतका परिणाम, तर भामिनीची दशा ह्या पेटीपुढें काय होईल ?

**विला०**—लक्ष्मीधरजी, तुम्हांला ह्या साऱ्या गोष्टीही समजूं नयेत ? दागि न्यांच्या लोभामुळें माझी अशी मुद्रा झाली आहे, असें का तुम्हांला वाटतें ? तुमचा एक एक शब्द जसजसा कानात जात होता, तसतशी खात्री होऊं लागली होती की भामिनीच्या ह्या कामांत आमची फक्त फजिती होणार. माझे हे उसासे त्यामुळें आहेत बर लक्ष्मीधरजी ! मित्र मी मागतो तसें थोडें ऐक; अजून बिघडलेली घडी माफ होईल.

**लक्ष्मी०**—मा कधी ऐकत नाही म्हटलें ?

**विला०**—ही पेटी अगोदर मिटून टाक हे पहा, ज्या पुरुषाच्या किंवा बायकाच्या मनांत कांही विशेष हेतु शिरलेला नसतो जे सामान्य ओघांत

१५ चाल—" यार के घर चल जाये " या चालीवर. ताल धुमाळी

घ–नि सा रे ग म ग ग- रे सा रे ग म रे ग– रे सा रे सा–
साऽम्य स म जु ळ त से ऽ सु ग त दि स त से ऽ स म म न ा ऽऽऽ
० - ० ४ ० ४
॥ ध्रु० ॥

धनिधनि सासासा धनिग रे ग रे सा रे- ध नि ध नि सा सा सा-
न व ध न स ह ज मिळत ध न वा ऽ नाऽ ध न जा ऽ म हि लाऽ
- ० - ० ४ ०

नि ग रे ग रे सा रे सा ग ग ग ग ग ग रे ग प म- ग– रे ग प म–
ध न म न मा ऽ ना ऽ व श यु व ती ऽ यु व ग णाऽऽसुंऽ द र ज ना ऽ
० ४ - ० ४ ० ४

ग-रे ग--प म--ग ग ग रे ग री (मंगरेंग)रे सा रे सा—
रूऽपमो ऽहनाऽ रसि क अं ऽ ग ना ऽ वि ल स ना ऽऽऽ ॥ १ ॥
- ४ ४ - ० - ४

वाहून चाललेले असतात. त्याच्यावर पैशाचा परिणाम होतो. आम्हीं पुरुष ज्याप्रमाणें पैशाकरितां पाहिजे तो धंदा पतकरतो, त्याचप्रमाणें बायकांचें आहे. पैसा असला म्हणजे त्याही पाहिजे त्याची अर्धांगी व्हावयाला तयार असतात. ही सामान्य स्त्रीपुरुषांची गोष्ट झाली. पण पैशामुळें प्रेम उत्पन्न होतें. असें मात्र समजूं नका. प्रेमाला हे चर्मचक्षच नाहीत. व त्यामुळे लक्ष्मीचा लखलखाटही त्याला दिसत नाहीं.

[ पद १६- राग खमाज, ताल दादरा. ]

**प्रेम नावडे बहिरंगी, झुलत खुलत जसें प्रेम कार्यवशें ॥ ध्रु० ॥ चपला धवला मेघकरी, मुखरूप भिन्न जगीं सुखी दिसे ॥ १ ॥ भिन्ना हृदया एक करायाा कार्य एक तें हेतु असे ॥ २ ॥.**

म्हणून म्हणतों, हे बाहेरचें डोळे मिटा आणि आपल्या अंतर्यामीं शिरण्याचा प्रयत्न करा.

१६ राग-खमाज, ताल दादरा.

( गपम ; ग ( मार्नी ) सा रे ग— ग प ग प म ( गरे )
प्रे ऽ म न ऽ व डे ऽऽऽऽऽ ब हि रं ऽ गी ऽ

पर्नाध नीधप म (धप) (मग) म ग ध प म ग म
झुल खुलत ज से ऽ प्रे ऽ म का ऽ र्य व शे ऽ ॥ ध्रु० ॥

ग म (पधर्नासां) नीनी सां—— ध (सांनी) प ध प——
च प ला ऽ धव ला ऽऽऽऽऽ मे ऽ घ क री ऽ

ग म (पधनीसां)सां ध(सांनी)प ध प ग म (धप) म ग—
मु ख रू ऽ ऽ प भि ऽ न्न ज गीं ऽ सु खी ऽ दि से ऽ ॥ १ ॥

ग म (पधनिसांनिसांनिधपधनीसां) नीनीसां — धर्नाधर्नापध प——
भि ऽ न्ना ऽ ऽ ऽ हृदया ऽऽऽ ए ऽ क करा ऽ या ऽऽऽऽऽ

(पधर्नासा) सां धर्नाध प——— (गमपध) प म ग
का ऽ र्य ए ऽ क तेऽऽऽऽऽ हे ऽ तु अ से ऽ ॥ २ ॥

**लक्ष्मी०**—बरें बुवा, आपण सांगतां तसें आम्ही वागतों. ह्या दावे-न्यांचा मारा आम्ही वरून करतोंच, शिवाय तुमचाही उपाय आंतून योजतों.

**विला०**—हें पहा, भामिनीचें लक्ष थोडेंसें शौर्याकडे वळलें आहे.

**लक्ष्मी०**—आहे, वळलें आहे, समजलें. आतां मी कोठें आणि कसा शूर होऊं, तें सांगा. आपलें काय जातें शूर व्हायला ? दागिनेही अंगावर घालावेत. शूरही व्हावें, जें पडेल तें काम करावें. अहो, मनासारखी बायको मिळवाव-याला हरकाम्यासारखें राबायला कोणची हरकत ?

**विला०**—आतां कसें ठीक बोललांत ! आतां कसें शूर व्हावयाचें सांगतों. छावणींत नवी दंवडी पिटलेली तुम्हांला माहीत आहेच:—

**लक्ष्मी०**—कोणची नवी दंवडी ?

**विला०**—शत्रूच्या लहान लहान तुकड्या रात्रीची लुटालूट करण्याकरितां फिरूं लागल्या आहेत; अहो असे काय भितां ?

**लक्ष्मी०**—येथें आतां येणार आहेत काय लुटालूट करायला ?

**विला०**—अहो असे काय भितां ? येथें कोण येतो ? अहो दंवडीचा हकी-गत मी सांगतों आहें; लुटालूट करायला शत्रु येत असतात; आतां आलेले नाहींत.

**लक्ष्मी०**—येत असतात; आतां आलेले नाहींतना ?

**विला०**—नाहीं.

**लक्ष्मी०**—मग हरकत नाहीं. बरें आतां पुढें सांगा तुमची गोष्ट. दंवडी पिटली आहे; पुढें ?

**विला०**—दंवडी पिटली आहे, शिवाय भामिनी तिच्या मैत्रिणींच्या बागेंत राहूं लागली आहे. तेव्हां मी म्हणतों, मी शत्रूचें सोंग घेतों आणि भामिनीला लुटायला जातों; भामिनी ओरडूं लागली म्हणजे तुम्ही एकदम पुढें या, आणि पुरूरव्यानें उर्वशीला सोडविली तशी सोडवा. आलें कां ध्यानांत ?

**लक्ष्मी०**—कसें म्हणतां; भामिनी ओरडूं लागली म्हणजे मी शूराप्र-माणें तुमच्या अंगावर धावून यावयाचें ? बरें; हें सर्व ठीक आहे; पण कायहो, तुम्हीच माझ्याशीं लढूं लागलां म्हणजे ?

विला०—तसें नाही हो: तुम्ही पुढें येऊन माझ्यावर तलवार उपसलीत म्हणजे मी पळूनच जाईन.

लक्ष्मी०—तुम्ही भित्रे आणि मी शूर. असें दाखवावयाचें ?

विला०—हो असेंच. म्हणून म्हणत होतों, तुम्ही तलवार आणली असतीत म्हणजे माझ्या अंगावर तलवार उपसून कसें धावून जावयाचें तें शिकवलें असतें

लक्ष्मी०—तें नको शिकवायला. मूळचं पाणी आपोआप बाहेर पडेल.

विला०—तुमची नाहीं तर ही माझी तलवार घ्या. आणि दाखवा पाहूं माझ्या अंगावर कशी तलवार उपसाल ती.

लक्ष्मी०—ठीक आहे, दाखवितों. तुम्ही भामिनीच्या अंगावर तुटून पडल्यासारखें दाखवा.

विला०—बरं आहे, भामिनीला मीं धरलं आहे असें समजा, आतां दरडावून बोलतों कीं लगेच तुम्ही तलवार उपसा.—ए मुलींनो, एकूणएक दागिना काढून द्या, नाहीं तर प्राणास मुकाल.

लक्ष्मी०—( कांपत ) सगळे दागिने आम्ही देतों, पण आमचे प्राण घेऊं नका, सगळे दागिने घ्या, अंगावरचे घ्या, पेटींतले घ्या—

विला०—अहो. असं काय करता ? तुम्ही माझ्या अंगावर तलवार उपसून या आणि म्हणा—

लक्ष्मी०—हो, तें मी विसरलोंच ! तुम्ही फार दरडावून बोललां, त्यामुळें माझी अशी धांदल झाली. शिवाय तुम्ही उत्तरेकडच्या भाषेंत बोललां नाहींत, म्हणून तुम्ही चोर व मी मोर हें ध्यानांतच राहिलें नाहीं. आतां उत्तरेकडच्या भाषेंत बोला, म्हणजे घेतों तुमचा समाचार. ( विलासधर तेंच वाक्य उत्तरेकडच्या भाषेंत बोलतो. लक्ष्मीधर कांपत गुडघे टेकून दागिन्यांची पेटी पुढें टेवून अंगावरील दागिने उतरीत पूर्वींचेंच वाक्य म्हणत राहतो. )

विला०—हें काय लक्ष्मीधरजी ? अहो तुम्ही, शूर आहां, वीर आहां, विसरूं नका.



लक्ष्मी०—सगळे दागिने घ्या, अंगावरच घ्या, पटांगल घ्या—

**लक्ष्मी०**—बरी वेळेवर आठवण केलीत. आतां नाहीं चुकायचें. हें पहा, छाप्याच्या वेळेला तुम्ही असें करा, उत्तरेकडच्या भाषेंत कांहीं बोलूं नका. या भाषेनें फारच भेदरून गेल्यासारखें होतें. भामिनीच्या अंगावर आतां-प्रमाणें वस्सदिशीं ओरडूं नका; बायकांप्रमाणें मृदु बोला, " मुलींनों दागिने काढून द्या, नाहींतर प्राणास मुकाल. "

**विला०**—भामिनी पुढें आपली अर्धांगी होणार, म्हणून एव्हांपासूनच तिची इतकी काळजी करूं लागलां वाटतें ! मी भामिनीच्या अंगावर वस्सादिशीं ओरडलों आणि तिला भीति वाटली, तर काय बिघडणार आहे ?

**लक्ष्मी०**—तीं कदाचित् भ्यायचीच नाहीं, पण मी भ्यालों म्हणजे सगळेंच फसेल. म्हणून म्हणतों, तुम्ही मृदु बोला; मुलींनो, दागिने काढून द्या, नाहींतर प्राणास मुकाल. म्हणजे मी पहा कसा गर्जत तुमच्या अंगावर चाल करून येतों तो ! शिवाय त्या तुमच्या तलवारीनें जमत नाहीं. माझ्या तंबूंत चला, तेथें माझी गंजलेली तलवार साफ करूं. मग माझ्या अंगांत अवसान येईल.

**विला०**—चला तुमच्या तंबूंत जाऊं. तेथें मी तुम्हांला सगळें नीट शिकवितों. ( जाऊं लागतात. ) ( स्वगत ) आम्हां लक्ष्मीपुत्रांची अब्रू संभाळण्याकरितां या भित्र्याला मारून मुटकुन शूर बनविला पाहिजे. [ जातात. ]

## प्रवेश दुसरा.

**स्थळ**—कुसुमच्या घरासभोंवारचा बाग.

[ धैर्यधर व शीलधर प्रवेश करितात. ]

**धैर्य०**—हें पहा शीलधरजी, मी अलीकडे थोडे दिवस पाहतों आहें, त्या घरांत वस्ती पुन्हा झालेली दिसते !

**शील०**—आपण मिळविलेल्या विजयामुळें शत्रूचें आतां कांहीं चालणार नाहीं, असा विश्वास लोकांच्या मनांत उत्पन्न झाला आहे; आणि लढाई भरांत असतांना शत्रूच्या भीतीमुळें शेतवाडी सोडून गेलेले लोक पुन्हा परत येऊं लागले आहेत.

**धैर्य०**—त्यांनीं परत यावयाला थोडीशी घाई केली; अथवा घाई तरी कसली ? मजकडूनच चुकलें. लग्नाच्या नादीं भलत्याच वेळीं मी लागल्यानें सैन्याची शिस्त

थोडीशी बिघडली, व त्यामुळें शत्रूला फूस मिळाली. बरें झालें, मी लगेच परत आलों, नाहींतर ह्या चोरट्यांचें प्रस्थ अधिकच माजलें असतें. आम्ही आज सात आठ दिवस जसा बंदोबस्त ठेवला आहे तसाच बंदोबस्त आणखी थोडे दिवस ठेवला म्हणजे हे चोरटेही नाहींसे होतील.

**शील०**—ह्या चोरांना बहुतेक नायनाट झालेलाच आहे. कालपरवां त्यांनीं पुन्हा डोकें वर केलें; कारण मेघांनीं चंद्राला झांकून टाकल्यामुळें दोन दिवस काळोखाची त्यांना मदत मिळाली.

**धैर्य०**—आजही मेघ थोड्याच वेळानें ह्या चंद्राला झांकून टाकतीलसें वाटतें.

**शील०**—ते पहा, ते काळे मेघ कसे चोहों बाजूंनीं वर चढूं लागले आहेत !

**धैर्य०**—आणि चोरांनीं गांठलेला मनुष्य दीन मुद्रेनें जसा मदतीची वाट पहात असतो, त्याप्रमाणें हा चंद्र दीन मुद्रेनें आतां मजकडे पाहूं लागला आहे !

**शील०**—खरोखरच चंद्राची ह्या वेळीं दीन स्थिति झालेली दिसते ! इतक्या काकुळतेनें आमच्याकडे कां पहातोस ? ह्या मेघांपासून आम्ही तुझें कसें संरक्षण करणार ?

**धैर्य०**—मेघ जसजसे वर चढत चालले तसतसा हा बेटा अगदींच भांबावून गेला ! पहा कसा एकदम पांढरा फिकट पडला ! आपली चंद्रिका कोठें लपवून ठेवूं अशी याला चिंता पडलेली दिसते ! [ भामिनी बागेंत येते. ] शीलधर, ही कोण ? पाहिलीस का ? ही कोण ?

[ पद १७.–" मनुजा सुगुण "–या चालीवर. ]

**चंद्रिका ही जणूं ठेवि या स्नेहें कमलांगणीं । कुमुदबांधव श्यामला मेघा तस्कर मानोनी ॥ ध्रु० ॥ चंद्रसदननभमंडला मेघांनीं वेढियलें । शोभाधन विपुल तें लपवितां कोपें भरलें । शोधित वेगें दशदिशा भूवरी सकल आले । आतां निकरें सरसावले, दिसत ही या क्षणीं ॥ १ ॥**

---

( चाल—मनुजा सुगुणि. ताल–त्रिवट ).

सा--ध–सा–धसासा गंरे(सांरे) म ग रे रे म रे प—पधसां ( पंधसां )
चं ऽ द्रि का ऽ ऽ ऽ ऽ ही ऽ ज णूं ऽ ठे ऽ वियाऽऽऽ स्नेऽ हे ऽ
* – ० – * –

[ पुढें चालू

शीलधरा, ही कोण, कोणाची, इतक्या रात्रीं बागेंत एकटीच कां फिरत आहे, याचा शोध केला पाहिजे. चोऱ्या करायला शत्रु रात्रींचे फिरत असतात, हें त्ला माहीत नसावें !

शील०—माहीत नसायला काय झालें ? सावध असण्याची ताकीद सर्वांना पोंचली आहे.

धैर्य०—माहीत असूनही धिटाईनें फिरत आहे !—आमच्या स्त्रियांच्या अंगची ही धिटाई पाहून चोऱ्या करण्यास उद्युक्त झालेले शत्रू आश्चर्यचकित होतील, नाहीं ?

शील०—धिटाईमुळें ही बागेंत फिरत आहे असें म्हणण्यापेक्षां, आपल्या पराक्रमाबद्दल खात्री पटून कोणालाच—बायकांनाही—शत्रूची भीति वाटेनाशी झाली आहे, असें म्हणणें अधिक सयुक्तिक होईल.

पं ध (पधसांसां) धप मम्रेसा सासाध्
क म लां ऽ ग णीं ऽ ऽ । चंद्रिका........ठेविया ऽऽ कु मु द
० — ✻ ✻ —

सा—सासा रेगम् ग रे——रेम्प——सां——पप
बां ऽ ध व ह्या ऽ म ला ऽऽमेऽघा ऽ त ऽ स्कर
० — ✻ —

पधसां धपम्गरे सा——
मा ऽ नीं ऽ ऽ नीं ऽ ऽ ॥ ध्रु० ॥
० — —

ध—प् म्गरे सारे सारेम् गरे——रे—म्—प—
चं ऽद्र सदन न म मं ऽ ऽडल ऽऽऽमेऽ घाऽ नीऽ
✻ — ० — ✻ —

पध सांनि ध प प— प ध सां——— रें सां रें मं गं रें —
वे ऽ ढि य लेऽऽऽ शों ऽ भा ऽऽऽऽऽ घ न वि पु ल ते ऽ
० — ✻ — ० —

गं रें गंसां— ध प सां प ध सां ध प म् रे ग सा—
—पं क्तिऽ ऽ ऽ ऽ ऽ कों ऽ ऽ पे ऽ ऽ भ र ले ऽ ॥ १ ॥
✻ — ० —

**धैर्य०** —शत्रूचा भीति हिला वाटत नसली तरी ह्या मेघांची भीति वाटलीच पाहिजे ! मेघांकडे हिचें लक्ष नाहीं म्हणून ही तशीच बागेंत उभी आहे. शीलधरा, चल. आपण जवळ जाऊं. ही कोण, कोणाची. बागेंत कां, वगैरे सर्व तिला विचारून घेऊं. ( जवळ जातात. ) शीलधरा, विचार. सर्व कांहीं विचार.

**शील०** —बाई, आमच्या सैन्याचे मुख्य सेनापती धैर्यधरजी आपणास विचारीत आहेत. आपण कोण, कोणाच्या, येथें कां. शत्रूची भीति आपणास वाटत नाहीं काय. कदाचित् पावसानें नाहीं कां भिजणार. घरांत आपल्या कोण आहे ?

**धैर्य०** —शीलधरा, तिला असें एकदम विचारूं नकोस. चोरांच्या व मेघांच्या भीतीनें ही भ्यालेली दिसते; आणि त्यांत तुझ्या प्रश्नांचा हा भडिमार ! भिण्याचें कारण नाहीं. मन मोकळें करून आपली हकीगत सांगा.

**भामि०** —महाराज, थोड्या वेळापूर्वी पावसाची भीति होती; पण आतां आपण आल्याबरोबर ते मेघही मागें परतले ! —सर्व सेनेचे मुख्य धैर्यधर हे येथें असतांना चोराची भीति कोणाला वाटणार आहे ? बाकी चोरांच्या भीतीचा लवलेशही माझ्या मनाला येथें कधींच शिवला नाहीं; आमच्या ह्या घरांत एक फुटकी कवडीदेखील चोरांना मिळावयाची नाहीं.

[ **पद० १८** "शाम तोरे नयन वा जादु भरे" या चालीवर. ]

**मी अधना, न शिवे भीति मना. योग्या धना चौर-चिंतना ॥ध्रु०॥ रवि हिमकरहो भययुत ग्रहणीं. भय नच तें दीपमना, समर्थी त्या दीपमना ॥ १ ॥**

---

राग- पिलू, ताल दादरा.

ग—ग ग रे (मंग) नी सा (गमपधपम) मंग—रेमंग— रे सा——
मीऽअ ध ना ऽ न शि वे ऽ ऽ ऽ भी ऽऽ ती ऽ म ना ऽऽऽऽऽ

प—— प ध प गमग—— ग-ग-ग— प म ( रेमपधप)
योऽ ऽ ग्याऽ ध ना ऽऽऽऽऽचौऽर चिंऽ त ना ऽ ऽ ऽ ऽ ऽ

[ पुढें चालू

धैर्य०—हें सर्व ठीक आहे; पण आपण कोण, कोणाच्या, आपले नांव काय?

भामि०—मला वनमाला म्हणतात. माझी बहीण पुष्पमाला, व आमचे बाबा असे आम्ही तिघे या घरांत राहतो. लढाईच्या वेळीं आम्ही दूर लांब रहायला गेलो होतों; पण आमचा उदरनिर्वाहच या बागेवर असल्यामुळे, आणि या बागेशिवाय आमच्या जवळ पैसाअडका कांही नसल्यामुळे, आम्ही घाईघाईनें परत आलें.

धैर्य०—वनमाले, पैसाअडका म्हणजेच कांही धन नव्हे.-तूं व तुझी बहीण पुष्पमाला, तुम्ही दोघीजणी म्हणजे तुझ्या बापाजवळ मोठें धनच आहे, असें समजलें पाहिजे. आणि चोरींत असलें धन हातां लागण्याचा संभव असल्यावर शत्रु तर चोर होतीलच. पण मित्रानाही चोर व्हावेसें वाटेल

भामि०—शत्रूसंबंधाची बेवढा ऐकिल्यावर असलीं कसलीशीं भीति बाबाच्या मनात येऊन त्यांनी आम्हाला जागे राहण्यास सांगितलें. बाबा दिवसभर बागेत राबत असतात; त्यामुळे जागें राहण्याचें काम आम्हालाच करावें लागतें. पण पुष्पमाळेला झोप लागली. त्याप्रमाणें मलाही झोप गांठेल या भीतीनें मी बागेंत जरा फिरत होतें; इतक्यांत आपण आला.

शील०—आपण पहारेकऱ्याचें काम करीत होता आहां—एकूण

भामि०—हो, तसें म्हणायला कांही हरकत नाही.

धैर्य०—शीलधर, बायकांवर पहारे करण्याची पाळी यावी, हें कांही ठीक नाही. हाच का तुमचा बंदोबस्त?

नी ऽ ऽ ना ऽ ... ... ॥ ध्रु० ॥

नि सा ग म प प प--- ग म ध प ग रे नि सा-----
र वि रह में थ र हीऽऽऽऽऽऽस थ यु त ग्र ह णी ऽ ऽ ऽ ऽ ऽ

ग म प प (पधसांनीधप)मग—ग प म—साग म(गमपध-पम)
स य न च नें ऽ दी ऽ प म नाऽ न स यी त्या ऽ ऽ

ग—रे ग रे सा— { शेवटचे "प ऽ" व "ना ऽ" यांच्या
दी ऽ प ऽ म ना ऽ ॥ १ ॥ { प्रत्येकी दोन मात्रा समजाव्या.

**शील०**—मी पहाऱ्याची चौकी येथून हांकेवरच ठेवली आहे. खरें म्हटलें असतां त्यांनीं पहारा करण्याचें कांहीच कारण नाहीं. बाई, आपण खुशाल जाऊन झोंप घ्या; आपण काडीचीही भीति वाळगावयाला नको.

**भामि०**—मीं थोडा वेळ पहारा केला म्हणून त्यांत काय बिघडलें

**धैर्य०**—छे ! छे !

[ पद १९.–" घर जये हो बेहारी " या चालीवर. ]

**हा युवतिधर्म नोहे । सेना समरीं दुःखासि साहे ॥ ध्रु० ॥**
**कठोराघाता सहन कराया, कुसुमकोमला अबलाकाया,**
**बल न वाहे ॥ १ ॥**

**भामि०**—असें कांही नाहीं. आम्हां बायकांवर तसा प्रसंगच येत नाहीं, म्हणून तशा शूरपणाचीं कामें आमच्या हातून होत नाहीत. आम्ही इतक्या दिवस रणभूमीपासून दूर राहत होतों, तेव्हां आम्हांला वाटत असे त्या प्रदेशाचे आसपास गेलों की भीतीनें पाय लटलट कांपूं लागतील ! पण आतां थोडे दिवस येथें राहूं लागलों तों भीति पार नाहींशी झाली !

राग–खमाज. ताल दादरा.

मंगरी गसंनीसा ग रे ग (गमप) मगरे)--नी– ( नीसांरें सांनीसां )
हा ऽ यु व ति ध ऽ र्म नो ऽ हे ऽऽऽ पे ऽ ना ऽ ऽ ऽ
० * – ० * – ० * – ०
नी नी प——–गंप– (गमंपधसांनीध) (पग) मप (मगरे)
स म रीं ऽ ऽ ऽ दुः ऽ खा ऽ ऽ सि सा ऽ हे ऽ ॥ ध्रु० ॥
* – ० * – ० *
ग ग (गमपमगरींगमप) म–प—– प सां नी सां ध नी (धंपंमप) —
क ठो रा ऽ ऽ ऽ घा ऽ ता ऽऽऽ स ह न क रा ऽ या ऽ ऽ ऽऽऽ
* – ० * – ० * – ० * – ०
प नीं नीं (नीसांरें सांरें सांनसां)नी नी सांरेंसांनीसां नीनीप—
कु सु म को ऽ म ला ऽ ऽ ऽ ऽ ऽ अ ब लाऽऽऽ
* – ० * – ० * – ०
(गपधसांनीध) प—म् रे ग ( गमप ) प—
का ऽ ऽ या ऽ ब ल न वा ऽ हे ऽ युवति ध ऽ र्म... ॥ १ ॥
* – ० * – ० * – ०

धैर्य०—वनमाले, तुझा हट्टच असला तर पहारा कर; पण तूं घरांत जाऊन बंदोबस्तानें रहावेंस, हें उचित दिसतें. चला. शीलधरजी, इतर ठिकाणचा तुमचा बंदोबस्त मला नीट तपासला पाहिजे. आम्ही येतों, जरूर पडली तर मोठ्यानें ओरडल्यावांचून राहूं नका; एक हाकेवरच पहारेकऱ्यांची चौकी आहे.

भामि०—बहुतेक जरुरी पडणार नाहीं.

धैर्य०—देव तसेंच करो.–चला शीलधरजी. ( जातांना ) मला तुमचा येथला बंदोबस्त कांहीं पसंत पडला नाही.–ह्या वनमालेवर पहारा करण्याची का पाळी यावी ?

शील०—( स्वगत ) बंदोबस्तासंबंधाच्या सेनापतीसाहेबांच्या कल्पना वनमालेला पाहिल्यापासून बदललेल्या दिसतात !

धैर्य०—ती पहा अजून घरांत गेली नाहीं; पहारा करीतच उभी आहे !

शील०—अजून बऱ्याच चौक्या महाराजांना तपासावयाच्या आहेत; दुसरीकडे लवकर गेलें पाहिजे.

धैर्य०—पण ती अजून तशीच उभी आहे ! मला वाटतें तिला घरांत जा म्हणून सांगावें आणि आपण पहारा करीत उभे रहावें.

शील०—महाराज, जरा स्पष्ट बोलतो; अजून तपासणीचें काम फार आहे, सर्व काम आटोपल्यावर मग पाहिजे तर येथें परत येऊं.

धैर्य०—तसें नव्हे हो; पण ती अजून तेथेंच उभी आहे !

. शील०—महाराज, ह्या वनमालेच्या जागीं जर आपण पहारा करूं लागलां, तर शत्रूंनी हिच्या घरीं चोरी करण्याचें ऐवजीं हिनें मात्र आपलें मन चोरलें, असा बभ्रा सर्व सैन्यांत होईल !

धैर्य०—छत् ! तुमची आपली भलतीच कल्पना ! आपण बंदोबस्त ठीक ठेवला नाहीं, त्यावर पांघरूण घालण्याकरितां ही कृति वाटते ! चला, उचला पाय. ( जातांना वळून पाहून ) अरे अजून ती तेथेंच उभी आहे ! बरें झालें हा ह्यावेळीं मजकडे पाहत नाहीं. अजून ती तेथेंच उभी आहे ! मी कां बरें असा घरचेवर वळून पाहतों आहे ?

[ पद २०-" या नव बघुनि " या चालीवर. ]

**या नव नवल नयनोत्सवा । बघुनी मानस हें अनुभवत अभिनवा मोहन कोमल भावा ॥ ध्रु० ॥ रणस्नेहाची, सुंदर युवती । आतां करी समाप्ती । वाटे अस्त्रचि हें रिपु-हातीं । जिंकाया मम जीवा ॥ १ ॥**

[ धैर्यधर व शीलधर जातात. ]

**भामि०**---मी हीं अशी एका ठिकाणींच कशा खिळून उभी राहिलें आहे! अजून ते पाहत आहेत! त्यांच्या डोळ्यांच्या जादूमुळेंच मला येथून हालता येत नाहीं. ते पहा, ते पहा, इतके दूरवर गेले तरी पुन्हा मागें वळून पाहत आहेत! पण मी का त्यांच्याच वाटेकडे पाहत राहवें? का म्हणजे ते पाहत

२० राग-खमाज, त्रिताल.

सां--धनि̱पधम (गरे)सा ग--म̱ प म̱ प म̱ रिग सा- ग म̱ प-
या ऽन व न वल न य नोऽत्सवाऽऽऽव घु नी ऽ माऽन स हें ऽ

धसांधनि̱प म̱ प म̱ ग -सा- नी सा ध नि̱ ध नि̱ (पधप) (पधनि̱)
अ नु भ वत अ भिन वाऽ मोऽ ह न को ऽ म ल भाऽ वा ऽ

(धनीसां) धनि̱
या ऽ न व ॥ ध्रु० ॥

प प प-- प- (धनीध)सा--सासा सासासा--सा-- नी--सां नीध नी
ण स्नेऽहाऽ ची ऽ सुंऽद री यु व तीऽआ ऽ तां ऽ क री ऽ स

(सांरे सांनीधपधनीसा) नी----म̱--गम̱ प-- प ध(धनीसा) नीधम̱प म̱ग
मा ऽ ऽ ऽ प्तीऽऽऽवाऽ टेऽ अ ऽस्त्र चि हें ऽ रि पु हाऽ तींऽ

सां--नीसां धनि̱ धनि̱ (पधप) (पधनि̱) (धनीसां) धनि̱
जिंऽ का ऽ याऽ म म जी ऽ वा ऽ या ऽ न व..... ॥ १ ॥

आहेत म्हणून मी पाहतें आहे; नाहीतर मी कशाला त्यांच्याकडे पाहिलें असतें ? बाबांना, अक्कांनें, सर्वांनी ज्या ह्या माझ्या दृष्टीला नेहमीं द्रव्यदृष्टि म्हणावें, ती ही माझी दृष्टि याच बाजूला का लागून राहावी ? द्रव्याकडेच माझी दृष्टि लागून राहावयाची, ती मी धैर्यधराकडे एकसारखी पहात राहिले आहे; तेव्हा हें नवल नव्हे काय ? अथवा नवल तरी कसलें !

[ पद २१— ' इतना संदेसा मोरा ' या चालीवर. ]

**नयनें लाजवीत बहुमोल रत्ना । जणुं धैर्यधर धरित धन-दासम धना ॥ ध्रु० ॥ नमवी पहा भूमि हा चालतांना । सुचवीत निज तूंचि मजपुढें निर्धना ॥ १ ॥**

( चोराचे वेषांत विलासधर एके बाजूनें येतो, व दुसऱ्या बाजूनें लक्ष्मीधर हातांत नंगी तलवार घेऊन येतो. )

**लक्ष्मी०** —( स्वगत, कांपत ) ह्यांनी ही दाढी लावल्यामुळें यांचे मोग नवीनच दिसायाला लागलें आहे ! हे खरोखरचे चोर तर नव्हेतना ! तसें असलें

२१ राग—झिंझोटी, ताल अंपा.

नी प नीसा सारेग नी (रेसा) नी साध नीरेग नीरे सानी— .
न य नें ऽ लाऽज वी ऽ त ब हु मोऽल र ऽ त्ना ऽ ऽ

सासा ग- रे गम् (धप) मग ग(पम्) गरे साधनी ( नी रेगमगरे )
ज णुं धैं ऽ य ध र ध रि त ध न दाऽ स म ध ना ऽ ऽ ॥ ध्रु० ॥

नीसाग म् गप—प—प ग—प—ध (पधनीसानी) ध प
न मवी ऽ पहाऽ भूऽमि हाऽचाऽ ल त ऽ ना ऽ ऽ

नीसाग— रे गम् (मपधप) म् ग पम् ग मा- साधनी
सु चवी ऽ त निज तू ऽ चि म ज पु ढें ऽ निऽ र्ध

(धनीसारेगपमगरेसानीसा)
ऽ ॥ १ ॥

तर माझी धडगत दिसत नाहीं! प्रथम उलगडा करून घेतला पाहिजे. ( उ
अहो, तुम्ही खरोखरचे चोर आहांत का चोरांचे सोंग आणलें आहे?

**विला०**--एक अक्षर मोठ्यानें बोल. प्राणासच मुकशील. ए मुली, एक दागीना मुकाट्यानें दिला पाहिजे.

( भामिनी गांगरून तशीच उभी राहते. विलासधर लक्ष्मीधरास खुणा लक्ष्मीधर कांपत उभा राहतो. इतक्यांत चोर येतात. )

**पहि०**--शाबास शाबास, चांगली शिकार शोधून काढलीस. अरे, ती डेल कदाचित्; तोंडांत अगोदर बोळा घाला.

**दुस०**--ह्याच्या भीतीनें का तुम्ही असे स्तब्ध उभे राहिलां? याची वाट लावली पाहिजे.

**तिस०**--अरे वा, दागिन्यांनी कसा फुलला आहे!

**चव०**--शेपन्नास बायकांना लुटलें असतांना जितके दागिने मिव नाहींत, तितके दागिने ह्या गुलामाच्या अंगावर आहेत!

**लक्ष्मी०**--शेपन्नास कां? आमच्या गांवांतील सगळ्या बायकांना पुरून तील इतके दागिने माझ्या एकट्याच्या अंगावर आहेत.

**पहि०**--तुम्ही दोघे त्याला पकडा. आम्ही ह्या मुलीपाशीं कांहीं आहे तपासतो.

**लक्ष्मी०**--अहो विलासधरजी, अहो विलासधरजी, हे खरोखरीचे आले बरें; आतां माझी धडगत दिसत नाहीं. ही तलवार घ्या, आणि मा रक्षणाला कोणीतरी धांवा हो धांवा. [ तलवार फेंकतो ]

**पहि०**--विलासधरजी कोण? अरे, हा आमच्यापैकीं नव्हे; ह्याला पकर प्रथम. ( पहिले दोघे विलासधराला पकडतात. ओढाताणीत विलासधराची त त्यांच्या हातांत येते. दुसरे दोघे लक्ष्मीधराला पकडतात; इतक्यांत पडः तलवार हातांत घेऊन घराचे दरवाजाजवळ भामिनी उभी राहते ).

**विला०**--( स्वगत ) बेवकूब सोबती प्राणांची घेई आहुति.

**भामि०**--कुसुम, विनोद, उठा, जागे व्हा, मागच्या दारानें पळा, अ चौकीवर वर्दी द्या, चोरटे आले आहेत चोरटे. कुसुम, उठा, पळा. ( द चोर भामिनीच्या पुढें तलवारी उपसून उभे राहतात. )



मार्मि०—माझ्या हातांतील तलवारीला तुमच्यापैकीं कांहीं जणांचा बळी घेतल्यानंतर तसल्या तलवारींना मी बळी पडेन.

[ पृ. ८३

Sow. T. B. [illegible]



**पहि०**—एक शब्द बोल; इतक्या वेळ गय केली, या तलवारीला बळी पडावें लागेल.

**भामि०**—माझ्या हातांतील तरवारीला तुमच्यापैकीं कांहींजणांचा बळी घेतल्यानंतर तुमच्या तलवारींना मी बळी पडेन. [ " कुसुम, विनोद " हें वाक्य पुन्हा मोठ्यानें बोलते. ( पडद्यांत-अहो पहारेकरी, अहो पहारेकरी, धांवाहो धांवा, चोरट्यांनीं आमच्या बागेंतील घरावर दरवडा घातला आहे, धांवाहो धांवा. ) [ विनोद येतो. ]

**विनोद०**—( स्वतःची शेंडी एका हातानें ओढीत ) अहो, धांवा, धांवा, आमच्या घरांत चोर शिरले आहेत आणि माझी शेंडी धरून मला ओढीत नेत आहेत; धांवा, धांवा, कोणी तरी मला सोडवा. [ जातो. ]

**पहि०**—हें पहा, आतां कदाचित यांना मदत येऊन पोंचण्याचा संभव आहे. तुम्ही त्या दोघांना त्या झाडांशीं बांधा. आम्ही दोघे हिला आमच्या तलवारीच्या कैचींत अशीच अटकेंत ठेवितों. बांधा त्यांना झाडांना आणि त्यांच्या अंगावरचे दागिने उतरून घ्या. मदत येण्यापूर्वी तेवढे दागिने तरी हस्तगत केले पाहिजेत. ( लक्ष्मीधर व विलासधर यांना झाडांला बांधतात. दागिने काढून घेऊं लागतात. )

**तिस०**—काय हे श्रीमंत लोक आळशी आणि ऐदी आहेत! दागिने काढायला मदत केली तर काय यांचे हात दुखतील वाटतें!

**चौथा०**—बायका असते तर यांच्या हातांना श्रम दिले नसते. ए बदमाष, आपल्या हातांनीं दागिने काढ सगळे.

**लक्ष्मी०**—मारूं नका. आम्ही कांहीं त्या भामिनीसारखे अडथळा करणारे नव्हेत. आम्हांला उगीच कां मारतां! सगळे दागिने घ्या.

**पहि०**—सर्व दागिन्यांची रास एका जागीं करा.

**दुस०**—आज शकून चांगला लागला होता. शंभर पेट्या फोडून जितकें द्रव्य मिळायचें नाहीं तितकें एकदम मिळालें!

**चौथा०**—शिवाय, या भारवाहकांचें ओझेंही कमी झालें!

**तिस०**—( सर्व दागिन्यांची रास करून ) ठिकठिकाणीं पांगलेली संपत्ति

एक आर्त गोळा करून पराक्रमी पुरुषाकडे ती वाहून नेण्याकरितां परमेश्वरानें उत्पन्न केलेलीं गोजिरवाणीं गाढवें म्हणजे असले लक्ष्मीपुत्र होत.

**भामि०**—अहो, धांवा हो धांवा, ह्या बागेंतल्या घरांवर चोरट्यांनीं हल्ला केला आहे.

**पहि०**—अरेड, लागले नितकी आरड; आमचें काम बहुतेक आटोपलेंच. पावलांची चाहूल ऐकूं आली ! मदत येऊन पोंचली कीं आम्ही पोबारा केलाच

( एका बाजूनें शीलधर व दुसऱ्या बाजूनें धैर्यधर येतात )

**धैर्य०**—आतां पोबारा कुठला ! ह्या तलवारीला तुमचें रक्त प्यावयाला मिळाल्यानंतर तुमच्या हडकांना पाहिजे तर आम्ही त्या बागेंतून बाहेर फेंकून देऊं. ( सर्व लढतात. ) नको, वनमाले, नको. तुला जर लढण्याचे श्रम आम्ही दिले तर आमच्या हातांत ह्या तलवारी कशाला ! ( सर्व लढतात. इतर चौकीदार येतात; व चोराच्या मुसक्या बांधतात. )

**धैर्य०**—शीलधर, तुम्ही या दरवडेखोरांना घेऊन चौकीवर चला.

[ शीलधर चोरांना घेऊन जातो.

**लक्ष्मी०**—ह्या भागुबाईंना. कशी लाट मोडली गुलामाची ! विलासधरजी, तुमच्या भाकीत धैर्यधरजींनीं खरें केलें !

**धैर्य०**—कोण विलासधरजी ! कोण लक्ष्मीधरजी ! या चोरट्यांनीं तुम्हाला बांधून टाकावें असे ! अद्याप आमच्या लष्करांत तुमच्यासारखे लोक आहेत, म्हणून चोरांना असें फावतें ! वनमाले, हे फार मोठे गृहस्थ आहेत, लक्ष्मीपुत्र म्हणून नांवाजलेले आहेत, याना बंदोबस्तानेंच यांच्या नंबरकडे पाठविलें पाहिजे. यांच्या बरोबर यायला कांहीं पहारेकरी घेऊन येतो, तोंपर्यंत तूं यांना बंधमुक्त कर. [ जातो.

**भामि०**—लक्ष्मीधरजी, विलासधरजी, तुम्ही चोरी करायला—मला धरून न्यायला—आलां होतां, हें कांहीं धैर्यधरजींना माहीत नाहीं.

**लक्ष्मी०**—तें कसें त्याना माहीत असणार ! आम्ही दोघांनीं मिळून तो कट केला होता; त्याना कसा माहीत असणार !

**भामि०**—तो बेत धैर्यधरजींना मीं कळवूं नये, अशी जर तुमची इच्छा असेल—

**लक्ष्मी०**—हो, हाच इच्छा आहे.

**भामि०**—आणि तुम्ही माझ्या मदतीला आलां असतांना चोरांनी तुम्हाला बांधून ठेविले—

**विला०**—अशी नको व्हायाला धैर्यधरजींची समजूत. आम्ही रस्त्यानें सहज जात होतों, चोरांनीं हल्ला करून अवाचत निःशस्त्र केले, आणि मग येथें आणून बांधले, आमचा नाइलाज झाला म्हणून ही दशा झाली, अशी धैर्यधरजींची समजूत झाली पाहिजे. भामिनी, तुझी वडील वहीण माझी बायको असून तिच्या संसाराचे मातेरें करणें माझ्या हातचे आहे, हे विसरूं नको. मी आतां सांगितलें तशीच धैर्यधराची समजूत झाली पाहिजे. नाही तर—

**भामि०**—तुमच्या अशा या धमकावणीला मी भीक घालणार नाहीं; पण तुमचीच काय, कोणाचीच बेअब्रू चारचौघांत व्हावी अशी माझी इच्छा नाहीं; तेव्हां आपण म्हणता तशीच धैर्यधरजींची समजूत होईल. मात्र मी भामिनी आहे, हें त्यांना समजतां कामा नये माझें आतांचें नांव वनमाला हें लक्षांत ठेवा—

**विला०**—कबूल, हे मला कबूल आहे

**लक्ष्मी०**—या तहनाम्याच्या सर्व अटी मलाही मान्य आहेत

**भामि०**—येथें तहनामा कसला आणि त्याच्या अटी कसल्या ?

**लक्ष्मी०**—नाही; चुकलों. आम्ही अगदीं दास आहों तुझे, असें समज; आणि या संकटांतून सोडीव आम्हाला.

[ पद २१. "अलि तूं नज ?कर" या चालीवर. ]

**तुज मी शरण आजि माफ मजला करा। मी सतत धरिन हे पाय, सेवक खरा ॥ धृ० ॥**

**भामि०—बाहुलें मी. सूत्रधारा माना धैर्यधरा। करूं नमन त्या नरवीरवरा। रिघा शरण त्या जनभीतिहरा॥ १॥**

**विला०—रविसम तोचि, हिमकर तूंचि, सुखकर साचि। तूं करीं सदय मन, शमें कोप मग मारा ॥ २ ॥**

**लक्ष्मी०—तुज मी शरण** ( पूर्वोक्त ).

२१ जिल्हा—ताळ धुमाळी.

सांनी धप—मगम् पध प—मगम् पध प—म् सारेगम् ग रेसा—

तु ज मीऽ ऽऽशर ण अजि मीऽऽऽशरण अजि माऽ ऽफ मजलाऽ क राऽऽऽऽ

[ पदें चालू

**भामि०**---ते पहा, धैर्यधरजी येऊं लागले, त्यांचीं आर्जवें करा, म्हणजे तुमचे दागदागिने नाहींसे होणार नाहींत व आपल्या अब्रूलाही धक्का लागणार नाहीं.

**विला०**---नाहीं, आतां आम्ही येथें राहत नाहीं. तूंच त्यांना कसें सांगा-यचें तें सांग, आणि आमच्या अब्रूचें रक्षण कर. चला, लक्ष्मीधरजी, धैर्यधर येण्यापूर्वी आपलें तोंड येथून काळें करा; चला मजबरोबर.

**लक्ष्मी०**---आणि माझे दागिने !-मी हे घेऊन जाऊं का ?

**भामि०**---धैर्यधरजी आल्यावर त्यांच्या परवानगीनें घेऊन चला.

**विला०**---चला हो, आतां कसले दागिने घेऊन बसलां आहां ?

---

प--पपनी नीसांसां सां--नीं रें सां ( नीधप )पधनीसां नी धंप———
मीऽसत त ध रि न हे ऽपा ऽ ऽ य से ऽव क ख रा ऽ ऽ ऽ ऽ
– * – ० – * – ० – * – ०

॥ तुज मी ... ... ...

नी--रें सां नीध प--ग--म् गरेसा नी-- नी--नी--ध नीं सां———
धाऽऽ हु ले ऽ मीऽसूऽ ऽत्र धाऽराऽ मा ऽ ना ऽ धै ऽर्य ध रा ऽऽ ऽऽ ऽऽऽ
* – ० – * ० – * – ० – * – ० –

नीसां--नीधप ध--पधपम्गरेसा--सा ग--सागम् मंप--गम् गरे
क रू ऽ न म न त्याऽनरवीऽरवरा ऽ रि घाऽ शर ण त्या ऽजन भीऽ
* – ० – * – ० – * – ० – * –

सानीसा -
ति ह रा ऽ॥ १ ॥
० –

नीसागरे म्-- ग गम्धपध---ध सांनींपध सां-- सां सां सां--सांसांसां
रविमम तोऽऽ चि हिमकरतूऽऽचि सु खकर साऽऽ चि क री ऽम्न द य
* – ० – * – ० – * ० – * – ०

सांसां नीसांनी प--ध नीसां नींधप-
म न श मे ऽ कांऽ प म ग सा ऽराऽ ॥ १ ॥
– * – ० – * –

---

**लक्ष्मी०**--थांबा, जरा थांबा. धैर्यधर येऊं दे, त्यांच्या पायां पडतों, हात जोडतों, शरण जाऊन दागिने मिळवूं--

**विला०**--चलाहो, पायां काय पडता आणि दागिने काय मागता ? सेनापती-साहेबांकडून हे दागिने तुम्हांला मिळतील असें तुम्हांला वाटतें ?

**लक्ष्मी०**--हातांत भरलेल्लीं पायां पडण्याची कांकणें वाजलीं म्हणजे धैर्यधर असो, का सेनापती असो, का मोठा बागुलबोवा असो, सर्व मऊ पडतात. अहो, आपल्या जवळची श्रीमंती सर्वांच्या नजरेस पडावी म्हणून बायकांचा नटवे-पणा श्रीमंतांना जसा हवासा वाटतो, त्याचप्रमाणें शूर पुरुषाजवळचा दयेचा अलंकार अंगावर घालून घरोघर त्यांचें प्रदर्शन करण्याऱ्या कांहीं पात्रांची जरूरी थोरामोठ्यांना असतेच. याच कारणामुळं देवही भक्तावर दया करितो. म्हणून म्हणतों पायां पडून हे दागिने,--

**विला०**--चलाहो, झाली एवढी फजिती पुरी नाहीं का झाली ? चला मुकाट्यानें मजबरोबर. [ लक्ष्मीधरास घेऊन जातो.

**भामि**--या लक्ष्मीधराला द्रव्याशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं !--मला तरी असेंच नव्हतें का वाटत ? आज माझ्या डोळ्यांत अंजन धैर्यधरजींनीं घातलें आणि माझी दृष्टि साफ केली.--लक्ष्मीधर म्हणतो त्याप्रमाणें देव भक्तावर मोब-दल्याकरितां कां दया करितो ? दया आणि प्रेम यांचा बाजार असूं शकतो काय ? नसतो म्हणावें तर आजपर्यंत, भामिनी, तुझ्या प्रेमाचा लिलांव वीस लाख पंचवीस लाख, असा कां पुकारला जात होता ? पण प्रेम म्हणून ज्याला म्हणतात त्याची आणि माझी इतक्या दिवस ओळख कोठें होती ? बाजारी जिन्नस नेहमीं नकली असावयाचा; तशीच माझ्या प्रेमाचीही इतके दिवस गोष्ट होती. खऱ्या दयेला आणि खऱ्या प्रेमाला केव्हांही मोबदल्याची जरूर नसते; कारण दया आणि प्रेम म्हणजेच सुखाचा झरा. त्याच्या पलीकडे आनंदाची पायरीच शिल्लक राहत नाहीं; मग प्रेमी जिवाला कोणचा लोभ शिल्लक राह-णार आणि मोबदला तरी तो कसचा मागणार ?

[ पद २२-" सखेरी मैका पिया बिन- " या चालीवर. ]

खरा तो प्रेमा ना धरि लोभ मनीं ॥ध्रु०॥ नाभिं जन हितरत, भास्कर तापत, विकसत पहा नलिनीं ॥ ना धरि ॥ पीडित जन देखतां, स्वसुखा त्यागी दया। जनभयहरणं हेंचि सुख, सदया देवराया ॥ दर्शन गुणवंताचें नाचवी प्रेमलहरी। गुणरसपान हेंचि सुख, प्रेम तया नांव जनीं ॥ १ ॥

[ धैर्यधर येतो.

२२ राग—पहाडी, ताल केरवा.

ग ध ध धप (पधनीसां) (पनींध) म् म् ग—सारींग गरीं सा——
ख रा तो प्रे मा ऽ ना ऽ ध रि लोऽ भ म नीं ऽ ऽ

सां मां री (नीरें सांनी) ध प (पधनीपध)
ना ऽ ध रि लो ऽ भ म नी ऽ ऽ ॥ ध्रु० ॥

सांसांसांसांसांसांसां (पध) मां सां सांरें गं रें रें सांसांसांसां सांनी
न भिं ज न हि त र त भा ऽ स्क र ता ऽ प त वि क स त प हा

ध प (पधनींसांनी)
न लि नीं ऽ ऽ ॥ १ ॥

सां—सांसांसांसांसांसांसां—(सांनीधपधनींसांरें नींसां)
पी ऽ डि त ज न दे ख ताऽ

प धं सां सांरें (सांरें मंरें गं) सासां (सांनीरें सांनींध, पधनीधपम्गम्)।
स्व सु खा त्या गी ऽ द या ऽ

धधधधधधध पध—(पम्) म् म् गग (पंम्ग) रे—ग सा—सा——
जनभय हरण हे ऽ चि सु ख सद या देऽ व रा ऽ याऽ

(गम्पधनीसां) सांसांसांसांसांसांसां—धसां रें (सांरीं मंरें गं)
द र्श न गु ण वं ता चें ऽनाच वी प्रे ऽ

[ पुढें चालू.

धैर्य०—काय विलासधरजी आणि लक्ष्मीधरजी निघून गेले ? मीं या पहारेकऱ्यांना उगीच बोलावून आणलें ! जा, तुम्ही आपल्या नाक्यावर पहाऱ्याला जा. ते मजकरितां थांबले कसे नाहींत ? मला त्यांची चौकशी करावयाची होती, या छावणींत ते असे रात्रींबेरात्रीं कोणाच्या हुकुमानें फिरत होते ? मीं त्यांना रात्रीच्या बंदोबस्ताकरितां नेमलेले नव्हते; मग ते येथें कसे आले ? वनमाले, माझ्या मनांत एक संशय येतो; मला तुला एक प्रश्न विचारावयाचा आहे. खरें खरें उत्तर देशील काय ?

भामि०—विचारायचा होता प्रश्न.

धैर्य०—( स्वगत ) मला भलताच संशय आला ! हे लक्ष्मीपुत्र रणमैदानावर असतांनाही आपले षोक पुरे करीत असतात, हे कांहीं खोटें नाहीं; आणि याबद्दल मीं कित्येकांना शिक्षाही केल्या आहेत. पण वनमालेपर्यंत ही गोष्ट येऊन पोंचते, हें प्रथम माझ्या ध्यानांतच आलें नाहीं.

भामि०—( स्वगत ) मी भामिनी आहें, हें यांनीं ओळखलें नाहींना ? ( उघड ) विचार कसला करायचा ? विचारायचा होता प्रश्न.

धैर्य०—( स्वगत ) हिचा त्यांच्या चैनीशीं कांहीं संबंध असणें शक्यच नाहीं; एरवीं माझ्या मनानें हिच्याकडे इतकी ओढ घेतली नसती. ( उघड ) प्रश्न म्हणजे असा, यांना येथें चोरांनीं बांधून ठेवलें कसें ?

भामि०—चोरांनीं त्यांना येथें धरून आणलें. विलासधरजींच्या हातांत तलवार नव्हती; लक्ष्मीधरजींच्या हातांत होती; ती खालीं पडली, मग मीं उचलून घेतली. हीच ती तलवार. हिच्या मुठीवर विलासधरजींचें नांव आहे.

धैर्य०—तुझी व त्यांची ओळख आहे काय ?

---

सां सां सां सां
म ल ह रीं
धधधधधध ( पध ) (पम्) म् म् ग ग (पंम्) ग—रे—ग सा सा
गुणरसपान हें ऽ चि सु ख प्रे म त याऽनांऽव ज नीं
माधरी ......... इत्यादि.

**भामि०**—मी त्यांना ओळखतें; पण त्यांनीं मात्र वनमालेला आतांपर्यंत कधींच पाहिलें नव्हतें.

**धैर्य०**—( स्वगत ) उगीच संशय इतकेंच.

**भामि०**—( स्वगत ) मी भामिनी आहें यासंबंधाचा संशय आतां मात्र यांच्या मनांतून पार नाहींसा झालेला दिसतो.

**धैर्य०**—विलासधरांची व तुझी कोठली ओळख ?

**भामि०**—आमची बाग त्यांच्या इनामांपैकीं आहे.

**धैर्य०**—ते रात्रीचे येथें कसे व कां आले असावेसें तुला वाटतें ?

**भामि०**—लक्ष्मीधरजींची चालचलणूक तितकी चांगली नाहीं म्हणतात; आणि विलासधर थोडे त्यांच्या नादीं आहेत. रात्रीचें बेसावधपणानें कोठें तरी जात असतांना चोरांची व त्यांची गांठ पडली असावी असें मला वाटतें.

**धैर्य०**—असेंच असेल. हे असले प्रकार लष्करांत उपयोगाचे नाहींत म्हणून मीं कितीदां तरी ताकीद दिली आहे. उद्यां त्यांची पुरी चौकशी करून लष्करी सरदारांच्या यादींतून त्यांचीं नावें काढून टाकलीं पाहिजेत. वनमाले, तुझ्या इतकेंही ज्यांच्या अंगांत शौर्य नाहीं त्यांना आमच्या या लष्करांत राहूं देऊन काय करायचें ? बरें झालें त्या भित्र्यांनीं या रात्रीं तलवार तरी बरोबर बाळगली होती; ती त्यांच्या नाहीं तर तुझ्या तरी उपयोगीं पडली. आज खरेंच तूं चांगल्या शूर पुरुषाला साजेल अशी तलवार चालविलीस. वनमाले, माझ्या मनांत असें आलें आहे, सरदारांच्या यादींतून त्या दोघांचीं नांवें कमी करून तुझें नांव त्यांच्या जागीं घालावें; आणि चोरांनीं लुटलेले हे दागिने सरकारांत जप्त करून पृथ्वीधर महाराजांच्या हस्तें तुला बक्षीस द्यावेत. पहा हे दागीने, हे तुला आवडतात का ? चांगले मौल्यवान् आहेत. पाहण्यासारखें जडजवाहीर जर कोठें असेल तर तें लक्ष्मीधरजींच्याच घरीं, अशी ख्याति आहे; आणि मला वाटतें, त्या भित्र्यानें आज निवडकच जवाहीर अंगावर घातलें होतें. पहा, खरोखर हे दागिने पाहण्यासारखे आहेत. वनमाले, सेनापती या नात्यानें हे दागिने जप्त करण्याचा व त्यांची पाहिजे तशी विल्हेवाट लावण्याचा अधिकार मला आहे. वनमाले, तुझ्या आजच्या शौर्याबद्दल, हे दागीने पृथ्वीधर महा-

राजांच्या हस्तें बक्षीस देण्याचें तितकें कांहीं कारण नाहीं; मीच तुला बक्षीस देतों.

**भामि०**—महाराज, मला हे दागीने बिलकूल नकोत. आम्ही खेड्या-पाड्यांत राहणारीं माणसें; आम्हांला काय करायचे हे दागिने? शिवाय या दागिन्यांचा मला मनापासून तिटकारा आहे.

**धैर्य०**—नको म्हणूं नकोस. घे हे दागीने. लक्ष्मीधर तितका चांगला नाहीं; तेव्हां त्याच्या घरची संपत्ति तितकी चांगली नसायची, हें खरें. पण तुझ्यासारख्या सुशील कुमारिकेनें या चंचल लक्ष्मीचा स्वीकार केल्याशिवाय ती पावन तरी कशी होणार? चंचलत्वाचा लक्ष्मीला लागलेला डाग तुज-सारख्या दागिन्यांची हांव नसलेल्या बायकांच्या सहवासानेंच धुवून जातो. पहा, पदरीं घ्या आणि पवित्र करा, अशा मुद्रेनें ही लक्ष्मी तुजकडे पाहत आहे! कर, तिच्यावर कृपा कर; नको, अशी दूर होऊं नको; शरण आलेल्यांना असें दूर लोटूं नये.

[ पद २४-" येरानात्सामी " या चालीवर. ]

**दे हाता या शरणागता ॥ ध्रु० ॥ मदविलसितनदगता पंक-युता मुखमलिना धना हो त्राता ॥ या ॥ १ ॥ चा० ॥ संपदा चपलचरणा । आपदा भोगि नाना । परत ये पद्मसदना । ॥चा०॥ कुवलय तव मुख तिला, अजि कमला विनवि तुला, मला घे आतां ॥ या ॥ २ ॥**

२४ ( चाल-येरानासामी, ताल त्रिवट. )

म् प सां—सांरे सां निसांनिध पधपम् गम्पधपंम्—ग्रेग्र—नीसा—
दे ऽ हा ऽऽऽ ऽऽऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽऽऽ ऽ ऽऽऽ ता ऽऽशरणाऽ ग ताऽ
— ० — * — ० — *

नीसागम् प प गम् प(रें सां)निधंप मधप ग् रे रेगम् पमप—
मैं द विल सि त नत ग त ऽ पं ऽक युताऽ मु ख मलिनाऽधनाऽऽऽ
— * — ० — *

[ पुढें चालू

घे, हे दागीने घे. काय, तूं ह्यांच्यापासून दूरच ! बायकांना दागिन्यांचा इ निटकारा, हें प्रथमच मी पाहत आहें. वनमाले, दरवडेखोरांच्या त्रासांतून तुम्हां मर्दांना सोडविलें, हें माझें कामच होतें म्हणा. पण त्याबद्दल जर तु मनाला कांहीं वाटत असेल, तर माझ्या त्या क्षुल्लक उपकाराचा मोबदला म्ह या दागिन्यांचा स्वीकार कर.

**भामि०**—महाराज, मी या दागिन्यांचा स्वीकार करितें; पण माझ्या अटी आपणास मान्य असतील तर.

**धैर्य०**—तुझ्या सगळ्या अटी मला कबूल आहेत. सांग, कोणत्या अ

**भामि०**—विलासधरजी व लक्ष्मीधरजी यांची सरदारांच्या यादींतील कमी करून माझें नांव घालण्याचा विचार रद्द करावा.

**धैर्य०**—ही विलक्षणच अट ! बरें कबूल. पुढें ?

**भामि०**—सांप्रतच्या युद्धांत आपल्या घरचे कर्ते पुरुष पडल्यामुळें कुटुंबें अनाथ झालीं असतील, त्यांना मदत करण्याकडे हे दागीने विकून ये ती रक्कम खर्च करण्याची मला परवानगी असावी.

**धैर्य०**—वनमाले, या दुसऱ्या अटीनें तूं धैर्यधरालाही लाजविलेंस. पुढें ?

---

सां—सां रें सां नि़सांनि़ध पधपम् गमपधपंम्—ग़्रे ध़—नी़ सा
हो ऽऽऽ त्राऽ ऽऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽऽऽ ऽ ऽऽऽताऽ ऽशर णाऽ ग ता ऽ॥ध्रु
\- ० - * - ० - *

नि़सां रें (मंग़्) रें सांनिसांरें ग़् रें सां नि़सांरें सां नि़धपम़्प नि़धप-
ऽऽऽऽ सं ऽ प दा ऽ च प ल च र णाऽऽऽऽऽआ ऽप दा ऽभोऽगि नाऽ नाऽऽऽ
\- ० - * - ० - *

ग म प पंम् ग़्रे सा सांर (गं रें सा)———
प र ह येऽ पऽ म्र स द ना ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
० - * -

( "कुवलय तव" वगैरे 'मदविलसित' प्रमाणें. )

भामि०—माझी तिसरी अट अशी आहे, आपण आज हे मजवर उपकार केले आहेत त्याची फेड म्हणून–फूल नाहीं फुलाची पाकळी–माझ्या हातीं आलेल्या या तलवारीचा आपण स्वीकार करावा.

धैर्य०—वनमाले, जायका दागिन्यांकरितां आणि आम्ही लष्करी लोक तलवारींकरितां हापापलेले असावयाचे; तूं दागिन्यांची हौस सोडलीस, त्याप्रमाणें तुला पाहिल्यावर तलवारींची माझी हौस मावळायला पाहिजे होती. पण माझा मूळचा स्वभाव पुन्हा वर डोकें करूं लागला आहे. शिवाय हें तुझ्या हातचें बक्षीस, मी कसा घेणार नाहीं? [ तलवार घेतो.

भामि०—आतां कशी या तलवारीला शोभा आली! माझ्या हातांत ती कशीशीच दिसत होती. महाराज, हे दागीने लक्ष्मीधरजींच्या अंगावर मीं पाहिलेले आहेत; मला बाई वाटतं, एका तलवारीने पुरुषांचें रूप जितकें चांगलें दिसतें तितकें खंडीभर असल्या दागिन्यांनीही दिसत नाहीं.

धैर्य०—वनमाले, हे दागिने तुजजवळ ठेव. पृथ्वीधर महाराजांच्या कानावर तुझी ही हकीगत घालून या दागिन्यांच्या दुप्पट रक्कम तुझ्या परोपकाराच्या कामाला मी बक्षीस देववीन. तोंपर्यंत हे दागीने तुजपाशीं असेच असूं देत. ठेव, घरांत नेऊन ठेव. तूं आतां खुशाल आपल्या घरांत नीज. आतांपासून ती तेथली चौकी मी या बागेंतच आणतों. मी आता जाऊन पहारेकऱ्यांना येथेंच पाठवून देतों. [ जाऊं लागतो.

[ पद २५–" मनसु करक " या चालीवर. ]

**युवतिमना दारुण रण रुचिर प्रेमसें झालें । रणभजना संसारीं असें अमर मीं केलें ॥ ध्रु० ॥ रमणीमनहंसा नरसाहससरसीं रमवीं, शूर तोचि, विजय तोचि, हें शुभ यश मज आलें ॥ १ ॥** [ जातो.

भामि०—( त्याला पाहत ).

२५ ( चाल—मन सुकरक, ताल दादरा. )

सांनि प ग रेसा ग– रेसासासा निनिप निगरे सा–गपनी—
यु व ति म नाऽ दाऽ रु ण र ण रु चिर प्रेऽम सें ऽझाऽ लें ऽ ।
* ‒ ० * ‒ ० * ‒ ० * ‒ ०
सांनि पगरेसा ग– रे–सा नि प निगरे सा गपनी–(सांनिपगरेसानिसा)
र ण भजनाऽ संऽ साऽ रींऽ अ सेंऽ अमर मींऽकेऽ ले ऽ ।
* ‒ ० * ‒ ० * ‒ ० * ‒ ०

[ पुढें चालू

[ पद २६-" तुम् से बचन दे " या चालीवर. ]

मला मदन भासे हा मोही मना । मानी जना या भासा-मना ॥ ध्रु० ॥ करी सनाथा मज तुडवी हा चरण-रजा-सम मानी मना ॥ १ ॥ प्रीतच्चि पाया रणप्रासादा दे पद-सेवा प्रेमी जना ॥ २ ॥ [ पडदा ]

[ अंक दुसरा समाप्त. ]

प प सां-सांसां निसां रेगं सांरे' गंमंगंरे' गंरे' सांरे' सांनिप नीप नींसांरें
र म णीऽ म न हं ऽ साऽ न र साऽ ह स स र सी ऽ र म वी ऽ।
* − ० * − ० * − ० * − ०
निपसां सां-सां निसांरे' गंसांरे' गंमंगं रेगं'रे सांरेसां निप प निसांरे'
शूऽ र तो ऽ चि विज य तोऽचि हे ऽ शुभ य श म ज आऽलें ऽ।
* − ० * − ० * − ० * − ०

२६ ( चाल—तुम् से बचन दे, ताल केरवा. )

सांसां-सांसांसां-निसांनिरेंसांनिध— पनिंधप ग—
म ला ऽम द न ऽ भा ऽ ऽ ऽ से ऽऽऽ मो ऽऽऽ ही ऽऽ
० * ० * ०
म् ग———म्—म्—म् म्—ध—
म नाऽऽऽऽऽऽऽऽऽमा ऽऽना ऽऽज नाऽऽऽहाऽऽऽ
* ० * ० * ०
प-निंध ग म् म् प———
भाऽ ऽऽ मा ऽऽ म नाऽऽऽऽऽऽऽ ॥ ध्रु० ॥
* ० * ०
सांसां-सांसां-सां-नि(रें सां)निधध पनि——सांसांसां
क री ऽ स नाऽ थाऽ म ज तुडवी ऽ हाऽ ऽऽऽऽ च र ण
* ० * ० * ०
नि(रें सां) निध पनिंध ग म् ग—नी—प-निंधप ग-म्
र जा ऽ स म मा ऽ नि म नाऽऽऽया ऽऽऽमाऽ ऽ ऽ नीऽऽ
* ० * ० *
म् ग———
म नाऽऽऽ ऽऽऽऽ ॥ १ ॥

* ( 'प्रीतचि पाया' वगैरे 'करी सनाथा' प्रमाणें )

# अंक तिसरा.

## [ प्रवेश पहिला. ]

स्थळ—अक्कासाहेबांचा महाल.

( अक्कासाहेब व विनोद बसले आहेत. )

**विनो०**—काय सांगूं अक्कासाहेब, विलासधरजींना पुरे लुबाडलें! अहो बरें झालें, माझ्या अंगावर कांहीं नव्हतें; शेंडीच्या कांहीं केसांवरच भागलें! नाहीं तर विलासधरजींना झाडाला बांधून चोरांनीं जसा चोप दिला तशी या विनोदाची गत झाली असती. मार खायला विलासधरजी खंबीर, म्हणून जिवंत आले. बाईसाहेब, मला जर तसा मार बसला असता तर मी मात्र आज तुमच्या दृष्टीसही पडलों नसतों. अरे बापरे! झाडाला काय बांधून घातलें होतें! आठवण झाली कीं अजून माझ्या पोटांत धडकी भरते; अहो, गोष्टीच्या भरांत येऊन जीभ झपाट्यानें चालूं लागली आणि तें पहा, तें पहा, झाडाला बांधून ठेवल्याचें चित्र पुढें उभें राहिलें! (विलासधर येतो.) महाराज स्वतःच आले आहेत, तेव्हां त्यांनाच आपण सगळी हकीगत विचारावी; माझी जीभ अडली.

**विला०**—कायरे कसली हकीगत ?

**विनो०**—मी सांगायचा नाहीं महाराज. बाईसाहेब, मला जायला परवानगी असावी. लग्नाशिवाय इतर प्रसंगीं बडे लोक कसे चतुर्भुज होतात, याची हकीगत मजसारख्या लहान लोकांनीं सांगत सुटूं नये; कारण हकीगत सांगणारालाच चतुर्भुज करण्यांत यावयाचें. [ जातो.

**विला०**—( स्वगत ) काल भामिनी परत आली आणि तेव्हांपासून पाहतों आहें, जो तो मजकडे चोरून बोटें दाखवूं लागला आहे. धैर्यधराशीं भामिनीचें लग्न होऊं दिलें नाहीं, तरच हा काळिमा धुवून निघेल.

**अक्का०**—विनोद काय म्हणत होता, तें ऐकणें झालें नाहीं वाटतें ?

**विला०**—( स्वगत ) आतां बायकोकडून अप्रतिष्ठा होणार. ( उघड ) विनोद काय सांगणार ? भामिनी जें म्हणते तें विनोद बोलतो, विनोद जें

बोलतो तेंच तूं उगाळीत बसतेस! कळूं द्या तर खरें भामिनीनें कालपासून वाभ्याभर कोणची गप्प पिकविली आहे ती.

अक्का०—आपल्या गळ्यांतली ती मोत्याची कंठी कोठें दिसत नाहीं?

विला०—ती चोरांनीं नेली. मीच तुला सगळें सांगणार होतों. ह्यांत भामिनीनें काय अधिक सांगितलें?

अक्का०—सांगूं का अधिक काय सांगितलें? मग मात्र एवढा एवढा डोळा करायचें होईल. भामिनी म्हणत होती चोरांनीं चांगलें प्रायश्चित दिलें–

विला०—कशाबद्दल?

अक्का०—मला वाटलेंच होतें, असे चोरून रात्रीचें फिरायची इकडे संवय लागली आहे म्हणून. तलवारी सुद्धां न घेतां अपरात्रीं कोणच्या अवदसेचें तोंड पहायाला बाहेर पडलां होतां?

विला०—( स्वगत ) भामिनीनें आमची बेअब्रू सगळी बाहेर फोडली नाहीं एकूण.

अक्का०—कां आतां बोलत कां नाहीं? इथें शहरांत असतांना रोज कांहींना कांहीं नवी सबब सांगून आम्हां बायकांना फसवायला ठीक पडतें! आज काय लक्ष्मीधरजींच्या घरीं गाणें आहे, उद्यां काय नाटकाचें आमंत्रण आहे, असें म्हणून रात्रीच्या रात्री बाहेर काढणें शोभून जातें! कोणच्याशा देशांत सांगतात तशीं नाटकें आमच्या या शहरांत रोज होत नाहींत, हें आम्हां बायकांचें भाग्यच समजायचें! तसें झालें तर मी तर सगळ्या गाणाऱ्यांना आणि नाटकवाल्यांना शाप देईन, मेल्यांचें देव निसंतान करो.

विला०—अग, तसें झालें म्हणजे त्या देशांतल्याप्रमाणें नवऱ्यावर पहारा करायला बायकाही नवऱ्याबरोबरच फिरूं लागतील. दोघेंही घरांत राहिलीं काय आणि दोघेंही बाहेर पडलीं काय, अखेर हिशोब एकच

अक्का०—असा पहारा करण्याची पाळी एकमेकांवर येण्यापेक्षां, परवां चोरांनीं जसें इकडे रानांत प्रायश्चित दिलें, तसलेंच प्रायश्चित जर शहरांतले चोर रात्रीं अपरात्रीं फिरणारांना अचुक लुबाडून देऊं लागतील, तर किती तरी बायका त्यांना दुवा देतील! उचले, खिसेकापू, यांनीं सज्जनांना त्रास देण्यापेक्षां अपरात्रीं भलत्या माड्यांवरून खालीं उतरणारांची नेमकी पगडीच पळवावी—

**विला०**—( स्वगत, डोळे मिटून ) माडींतल्या चोरांनीं पगडी चोरायची शिल्लक ठेवली तर !

**अक्का०**—कां डोळे मिटलेसे ? माझ्या बोलण्याचा कंटाळा आला वाटतें; म्हणून हें या वेळीं झोंपेचें मिष !

**विला०**—कंटाळा कसा येईल ? इतकें सुरस भाषण दुसरीकडे कोठें ऐकायला मिळायचें ! मीं कान उघडे ठेवले आहेत. चालूं द्या आपलें व्याख्यान. उच-ल्यांनीं पगडी पळविली; पुढें ?

**अक्का०**—बायकांनीं केलेली कानउघाडणी आपणाला नकोशी वाटावयाचीच. करून संवरून पुन्हा निरुपद्रवी सावाची अशी बनावणी करणाऱ्या सोंगाड्यांचे डोळे बायकांच्या अंजनानें कसचे उघडणार ! झाडाला बांधून ठेवणारे दरवडे-खोरच अशांना पाहिजेत. या असल्या फसव्या जगांत चोरांचा आणि दरवडे-खोरांचा फार उपयोग आहे.

[ पद २७.—" मोरा मेंदीका रंग " या चालीवर. ]

**चोरा थोरासम करी उपकार । धनमद चोरी फार ॥ ध्रु० ॥ पाप सदा प्रभू नेमी जाणा प्रमादकुलमरणा । या नियमें किती अधम नाना मिळविती उद्धार ॥ १ ॥**

---

२७ तिलक कामोद-दादरा.

ध प ध म् – ग रे ग मा नी नी सा – रे सा रे — सा रे ग म्
चो रा ऽ थो ऽ रा ऽ स म क री ऽऽ उ प काऽऽऽऽर ध न म द
•  *  ०  *  ०  *  ०  *  ०

ग – (सां रें ग) ग सा———
चो ऽ री ऽ ऽ फा ऽ ऽऽऽर ॥ ध्रु० ॥
*  ०  *

{ ' उपकार ' व ' फार ' यांतील ' र ' अर्धोच्चारित समजावा.

सा रे म् म् प – म् प ध प प – रे म् रे म् प ध म् – ग
पा ऽ प स दा ऽ ऽ ऽ ऽ प्र भू ऽ ने ऽ मी ऽ ऽ ऽ जा ऽ ऽ
*  ०  *  ०  *  ०  *

रेग रे सा म् म् – ग रे रे सा रे म् ग रे——
णा ऽ ऽ प्र मा ऽ द कु ल म ऽ र णा ऽ ऽ ऽ ऽ ऽ ॥ १ ॥
०  *  ०  *  ०  *

विला०—संपलें कीं आणखी कांहीं पुढें आहे ? मला कांहीं थोडें बोलूं देशील-

अक्का०—संपलें माझें, आतां आपण वळा आपलें-

विला०—हं म्हण चऱ्हाट. नवऱ्याची भीडभाड न ठेवण्याची अशी संधि पुन्हा यायची नाहीं. हं, म्हण, चऱ्हाट.

अक्का०—चऱ्हाटच तर काय ?

विला०—चोरांनीं मला झाडाशीं चऱ्हाटानें बांधलें, तसें मी तुला माझ्या चऱ्हाटांत आतां बांधूं इच्छित नाहीं. मला इतकेंच म्हणायचें आहे कीं, तूं जो मला आतां दोष दिलास, त्याला काडीचाही आधार नाहीं. मी पुराव्याचें माप तुझ्या पदरांत टाकीन. लक्ष्मीधरजींना मीं मवांशीच बोलावलें आहे; ते माझ्या महालांत येऊन बसले असतील. त्यांच्या देखत मी चोरांची हकीगत सांगतों; आणि तूंच त्यांना विचारून खरी का खोटी माझ्यासमक्ष पारखून घे. तुझी इच्छा लक्ष्मीधराचें भामिनीशीं लग्न व्हावें–होयना ? तूंच मला हें लग्न जुळवून आणायला सांगितलेंस ना ?

अक्का०—होय, नाहीं कोण म्हणतें आहे ? काल भामिनी छावणींतून परत आली. आतां धैर्यधरजीच्या गळ्यांत माळ घालायला फार उत्सुक झाली आहे; पण अजून मला वाटतें, लक्ष्मीधरजींशींच तिचें लग्न होईल तर बरें.

विला०—तुझ्याच या कामाचे पायीं तसा मीं चोरांच्या तडाक्यांत सांपडलों.

अक्का०—म्हणजे तें कसें ?

विला०—तें सर्व मी लक्ष्मीधरजीच्या देखत सांगेन, आणि मग तुझी खात्री पटेल. आतां मला इतकेंच सांगायचें आहे, तुझ्या नवऱ्याची जी फजीती झाली ती तलवार चालविण्यांत धैर्यधराहून मी कमी म्हणून नव्हे, किंवा भलत्याच नादीं लागून आम्ही फसलों असें नव्हे. तर आम्ही लक्ष्मीपुत्र धैर्यधराला त्या दिवशीं–भामिनीचें लग्न ठरत होतें त्या दिवशीं–हसलों, तें ध्यानांत धरून सेनापतीच्या अधिकाराचा दुरुपयोग करून, त्या दरिद्र्यानें आमचा चोरांकडून मुद्दाम म्हणून अपमान करविला ! त्याचा नीचपणा पूर्वीपासून जर मीं ओळखला असता तर चोरांबरोबरच धैर्यधरालाही भामिनीच्या समोर झाडाशीं

बांधून घातलें असतें. आठवण झाली कीं अशी अंगाची लाही लाही होते!

अक्का०—खरें का हें सर्व ? भामिनी तर त्या मेल्याची एकसारखी स्तुति-स्तोत्रें गात आहे!

विला०—आणि याच गोष्टीचें मला अत्यंत वाईट वाटतें. त्याचा नीच-पणा पाहून भामिनीला त्याचा राग यायला पाहिजे होता; उलट ती त्याच्यावर भाळल्यासारखी दिसते.

अक्का०—हो! असें झालें आहे खरें. कालपासून एकसारखी माझीं आर्जवें करते आहे, धैर्यधराशीं लग्न करायला भामिनी तयार आहे, असें तूं बाबांना सांग म्हणून.

विला०—छे! छे! हें लग्न मोडलेंच पाहिजे; एरवीं धैर्यधरानें केलेल्या आमच्या अपमानाची भरपाई होणार नाहीं.

अक्का०—मी तर पहिल्यापासून या लग्नाचे विरुद्ध आहें.

विला०—तुझ्या इच्छेप्रमाणें घडून यावेंसें तुला जर वाटत असेल. आणि तुझ्या नवऱ्याच्या अपमानाबद्दल जर तुला वाईट वाटत असेल, तर तूं असें कर—

अक्का०—काय करूं तें सांगा. मी आपल्या शब्दाबाहेर काडीभरही जाणार नाहीं.

विला०—मी बाबासाहेबांना सांगणार आहें तसेंच तूंही सांग.

अक्का०—काय सांगूं ?

विला०—भामिनीचें लग्न जर धैर्यधराशीं झालें तर आम्ही तुमचे कोणी नव्हे आणि तुम्ही आमचे कोणी नव्हे. एकमेकांचीं तोंडें देखील पहाणार नाहीं. मीं तर निश्चय केलाच आहे; माझ्या म्हणण्याप्रमाणें जर झालें नाहीं तर भामि-नीचें दर्शन घ्यायचा नाहींच नाहीं, बाबासाहेबांचेंही तोंड पाहणार नाही, शिवाय भामिनीला व बाबासाहेबांना शिक्षा म्हणून तुलाही टाकून देण्यास मी चुकणार नाहीं.

अक्का०—इतकें कांहीं नको वैतागायला. मी अशी जातें आणि बाबांच्या-पाशीं हट्ट धरून बसतें, पंचवीस लाखांच्या जहागिरदाराशिवाय दुसऱ्या कोणा-काही भामिनी द्यावयाची नाहीं. [ जाते.

विला०—हें बस्तान ठीक बसलें. त्या मूर्खाची स्वारी माझ्या महालांत येऊन बसली असेल; त्याला त्याची नक्कल नीट पढविली पाहिजे. [ जातो.

# प्रवेश २ रा.

स्थळ—बाबासाहेबांचा वाडा.

( लक्ष्मीधर आणि विनोद प्रवेश करितात. )

लक्ष्मी०—कायरे विनोदा, मला नीट पाहिलेंस का ? नीट पहा. मी पूर्वीसारखाच दिसतों का कांहीं नवा दिसतों ?

विनो०—पूर्वीसारखा म्हणजे ?

लक्ष्मी०—पूर्वीसारखा म्हणजे तुला माहीतच आहे त्या दिवसाच्या पूर्वीसारखा. अरे, तो दिवस आतां सर्वांना माहीत आहे. माझ्या सर्व नोकरचाकरांच्या तोंडीं तोच दिवस ! कोणाला कांहीं प्रश्न विचारला म्हणजे त्याला वाटतें त्याच दिवसासंबंधानें प्रश्न आहे; आणि त्यानें कांहीही उत्तर दिलें तरी मला वाटतें त्याच दिवसासंबंधानें उत्तर आहे. अशा त्या दिवसापूर्वीसारखाच मी दिसतों का फेरबदल झाला आहे ?

विनो०—सर्वांना तो महत्त्वाचा दिवस माहीत असेल. पण मला कांहीं माहीत नाहीं. बाकी आपल्या शरिरांत आज कित्येक वर्षें बिलकूल फेरफार नाहीं. चेंडूसारख्या झालेल्या खुशालचेंडूच्या शरिरांत फरक कसा होणार ? उभ्याचे आडवे झालां, तेव्हां लहानपणीं फरक दिसत होता. कोणचीही आकृति फुगूं लागली म्हणजे तिचें पर्यवसान वर्तुलांत होत असतें. आपल्या शरिराचें वर्तुल गरगरीत वाटोळें झाल्यावर आतां त्यांत नवीन फेरफार कसचा होणार ?

लक्ष्मी०—अरे, तसें नव्हे. मी म्हणतों, मी पूर्वी अंगावर दागीने घालीत होतों, त्यांत आणि आतांच्या दागिन्यांत कांहीं फेरबदल आहे किंवा नाहीं ?

विनो०—आपले पूर्वीचे दागीने चोरांनी लुबाडलेले भामिनी ताईसाहेबांपाशीं—

लक्ष्मी०—बस्स बस्स, तोच तो महत्त्वाचा दिवस, तो चोरीचा दिवस—बोल, त्या दिवसापेक्षां माझ्या अंगावर अधिक दागिने आहेत कीं नाहीं ?

विनो०—ते आपण भामिनी ताईसाहेबांना विचारा. त्यांनीं ते मोजून घेतले आहेत. मीं नाहींत.

**लक्ष्मी०**—पण मला माहीत आहे, माझ्या अंगावर पूर्वी किती होते, आणि आतां किती आहेत ते. सांगूं मी ? पूर्वीच्या प्रत्येक मोत्याच्या व हिऱ्याच्या जागीं दोन मोतीं व दोन हिरे भामिनीच्या दृष्टीस पडतील. विनोदा, मी या वेळीं दशकंठ किंवा सहस्रार्जुन झालों असतों तर बरें झालें असतें. पूर्वीच्या मोत्यांच्या एका कंठ्याऐवजी आज मी एका गळ्यांत दोनच कंठे मोठ्या मुष्किलीनें कोंबले आहेत. दशकंठ असतों तर वीस कंठे आणि दहा भिकबाळ्या एकदम घातल्या असत्या. फार बहार उडाली असती नाहीं ? सहस्रार्जुनाप्रमाणें जर हजार हात असते तर दहा हजार सोन्याचीं कांकणें—पुरुषांच्या कांकणाला सलकडीं म्हणतात—मीं एकट्या वीरानें आज भरलीं असतीं ! काय करूं रे एका हातात सगळीं दहाच कांकणे बसलीं ! विनोदा, देवादिकांत व अवतारी पुरुषांत ज्याप्रमाणें दहा तोंडांच्या व हजार हातांच्या वीरांचीं उदाहरणें आहेत, त्याप्रमाणें दोहोंहून अधिक पाय असलेल्या एखाद्या नररत्नाचें उदाहरण असलें तर तें मला सांग. काय ? कोणी नाहीं ? तसलें रत्न होण्याचा मान, देवा, मला प्रथम दे. हे दोनच पाय माझ्या नांवलौकिकाला कमी आहेत असे मला वाटूं लागलें आहे. शिवाय पाय दोनच असल्यामुळें जामदारखान्यांतील सर्व दागिन्यांचें ओझें सोसवत नाहीं. माझेच पाय म्हणून इतकें ओझें वाहूं शकतात. या दोनच पायांनीं आणखी किती दागिन्यांचें ओझें वहावें ?

[ **पद २८**—" पाठीस तिंडीक लागली " या चालीवर. ]

**हा भार सहन होइना । विपुल भूषणा नाहीं गणना ॥ ध्रु० ॥**
**मज दोन पाय, अधिक देइना । देव कसा, त्या नच करुणा ॥ १ ॥**

---

२८ राग पिलू, ताल धुमाळी.

प — प नि॒ध॒ प म॒ ग॒ रे ग — रे सा —— सा नी मा रे — ग
हा ऽ भा ऽ र स ह न हो ऽ इ ना ऽ ऽ ऽ ऽ वि पु ल भू ऽ ष
— * — ० — * — ० — * —

म॒ ग म॒— ग॒ रे ग रे सा—
णा ऽ नाऽ हीं ऽ ग ण ना ऽ ॥ ध्रु० ॥
० — * — ०

[ पुढें चालू

तुला माझें आश्चर्य नाहीं वाटत ?

**विनो०**—चार पायांनाही जितकें ओझें सोसवणार नाहीं, तितकें आपण दोन पायांवर वाहात आहां; आश्चर्य आहे ! हें ओझें पाहून, महाराज आपली कींव मला येते ! मी एखादा धिप्पाड दरवडेखोर या वेळीं असतों, तर किती बहार झाली असती ! आपलें ओझें तेव्हांच हलकें केलें असतें ! थोडे थोडे दागीने लागूं का उतरायला ? म्हटलें ओझें हलकें होईल.

**लक्ष्मी०**—छत् ! लागला हात लावायला ! तूं दरवडेखोरही नाहींस किंवा भामिनीही नाहींस. बदमाष चोरटे किंवा बायका आमच्यासारख्या लक्ष्मी-पुत्रांच्या घरांतील हा असला द्रव्याचा भार हलका करीत असतात.

**विनो०**—बरें, त्या पहा भामिनी ताईसाहेबच अक्कासाहेबांबरोबर इकडे येत आहेत. त्यांच्यापुढें तरी हें ओझें उचलून ठेवा. मी लागूं का गोण्या उतरायला ?

( भामिनी व अक्का येतात. )

**लक्ष्मी०**—आज नुसतें दाखवायचें ! ही पांचवी खेप या भामिनीच्या असा दृष्टीस पडण्याची; थोडा असातसा फिरून आणखी पांच वेळा तिच्या दृष्टीस पडणार, तोंपर्यंत या वाड्यांतच रेंगाळत राहणार आहें. पाहिलें—पाहिलें—दोघींनींही पाहिलें. विनोदा, त्या दिवसापासून भामिनीकडे माझ्यानें कांहीं पाहवन नाहीं; ती पहायला लागली म्हणजे मी असा पायाकडेच दृष्टि वळवून उभा राहतों. तूंच तिच्याकडे पहा आणि तिनें डोळे भरून मला पाहून झालें म्हणजे खूण कर; मग दुसरीकडे थोडा वेळ काढून पुन्हा तिच्या पुढेंपुढें करूं. कर हं खूण. माझ्या आड उभा राहून तूं तिच्याकडे पहा.

---

सा नी सा ग् रे ग – ग म् म् ग् रे ग् रे सा – ग म् प प प——

म ज दे ऽ न पा ऽ य अ धि क दे ऽ इ ना ऽ दे ऽ व क्ष साऽऽऽ

– * – ० – * – ० – * – ०

( पं मं ग् ) म् ग म् प ( मं पं नि् ) ध् प

त्या ऽ न च क रु णा ऽ हा ऽ भार ...... ॥ १ ॥

– * – ० – *

अक्का०—पाहिलेंस भामिनी, मी सांगत नव्हतें; एखाद्या चांगल्या शेत-कऱ्याच्या घरीं जशी बाजरी किंवा ज्वारी असते तसे हिरेमोतीं लक्ष्मीधरजींच्या घरीं आहेत म्हणून. असा हा द्रव्याचा पुतळा सोडून तुला तो मेर्देवर कसा आवडतो याचेंच मला राहून राहून आश्चर्य वाटतें!

लक्ष्मी०—विनोदा, यांच्या अंगावर माझ्याहून अधिक दागीने दिसतात काय? माझ्या नाकांत नथ नाहीं त्यामुळें कमीपणा दिसत असेल! हा असा ओका चेहरा भामिनीला कसा दाखवूं? काय बायका अप्पलपोट्या पहा; ह्यांनीं तेवढ्या नथा नाकांत घालायच्च्या, आणि आम्हीं पुरुषांनीं मात्र नाक टोंचायचें नाहीं. माझें मत आहे, ही रुढी पायाखालीं तुडवून पुरुषांनीं दोनही नाकपुड्या टोंचाव्या; एरवीं बायकांवर ताण व्हावयाची नाहीं. पुरुषी घाटाच्या नथा घाल-ण्याची सुधारणा अमलांत आणलीच पाहिजे. आम्ही बायकांसारखे केस नाहीं का ठेवीत, तिरपा भाग नाहीं का काढीत? मग नथेनेंच काय केलें आहे?

विनो०—आतां बोलूं नका. ताईसाहेब लक्षपूर्वक पाहूं लागल्या.

अक्का०—अहाहा! कितीतरी हे दागीने! काय ह्या हिऱ्यांचें व मोत्यांचें तेज! आमच्या पृथ्वीधर महाराजापाशींही असले व इतके दागिने नाहींत म्हण-तात! मला तर त्या कंठ्याकडे पहातच रहावेंसें वाटतें! तुला नाहीं तो आवडत? बघलास तो केवढा मोठा तरी हिरा आहे!

विनो०—आतां इथें उभे नका राहूं. ताईसाहेब रागावल्यासारखें दिसते.

लक्ष्मी०—असें का? येथून पाय काढूं, चल. एक चक्कर फिरून येऊन पुन्हा दृष्टीस पडूं, चल. [ लक्ष्मीधर व विनोद जातात.

अक्का०—अग ते गेले! चल, त्या तेथून चांगले दिसतील.

भामि०—काय करायचें आहे त्याला पाहून? ते दागीने त्याच्या अंगावर पाहिले म्हणजे मला अगदीं त्याचा तिटकारा येतो.

[ पद २९-" परदेसी संया " या चालीवर. ]

**धनराशी, दिसतां मूढापाशीं, सुखवी तुला, दुखवी मला ॥ ध्रु० ॥ शस्त्र जसें अबलाकराला, रूप जसें तें जोगिणीला, सत्ता सुखरत अधमाला, धन जड जना, मदत पतना ॥ १ ॥**

हा माझ्या दृष्टीस देखील नको. तूं त्याच्या दागिन्यांकडे पहात खुशाल उभी रहा; मी आपली जातें कशी. [ जाते.

**अक्का०**—काय करावें, हिला किती सांगतले; लक्ष्मीधराला पाहिलें कीं हिच्या कपाळाला आठ्या ! धैर्यधरानें कोणच्या जादूने हिला भारलें आहे कोण जाणे ! बाबांच्यापाशी मी हट्ट धरून बसले-तर-कसे होईल-लक्ष्मीधरालाच भामिनी दिली पाहिजे, असा हट्ट कांहीं चालायचा नाहीं. तेव्हां असा हट्ट धरावा, नवरदेवाला पंचवीस लाखांची तरी जहागीर ही पाहिजेच—

२९ धुमाळी ( चाल-परदेसी संया )

ध प प धसा ध सा रे सा रेग रेग ——— ग ग रे —
ध न रां ऽ शी ऽ जा ऽ ता ऽऽऽऽऽ ऽ दा ऽ
\- * - ० - * - ० -

सा रेग म् धं पं म ग म् ग रे नि सा – नि धं पं ध ग रे नि सा–
पा ऽ ऽ ऽ शी ऽ दु ख वी ऽ ऽ म ला ऽ सु ख वी ऽ ऽ
* - ० - * - ० - * -

नि ध सा
तु ला ऽ धन राशी ॥ ध्रु० ॥
०

ग – ग ग प ग प ग प ध ध प धनि ध प ग – ग ग ग म् ग
श ऽ स्त्र ज से ऽ अ ब ला ऽ ऽ क रा ऽ ला ऽ रु ऽ प ज से ऽ तें
* - ० - * - ० - * - ० -

रे ( सा रे ग म् प म् ) ग ग म्गरे सा (निसा) ग – ग म् रे ग रे
ऽ जो ऽ ऽ गि णी ऽ ला ऽ स त्ता ऽ ऽ ऽ सु
* ० - * - ० -

[ पुढे चालू

( कुसुम व दोन दासी येतात. )

**कुसु०**—पंचवीस लाखांची जहागीर धैर्यधरजींना मिळाली अक्कासाहेब.

**अक्का०**—म्हणजे ?

**कुसु०**—तुम्हांला नाहीं का समजलें ? जा ग तुम्ही अगोदर सांगितलें तसें करा. हें बघ माळ्याला म्हणावें हार चांगले झाले पाहिजेत.

**अक्का०**—अग कुसुम, ही गडबड आहे तरी काय ?

**कुसु०**—काय म्हणजे ? धैर्यधरजींना पंचवीस लाखांची जहागीर व तीन चांदांची सरदारकी पृथ्वीधर महाराजांनीं बहाल केली. आतां सकाळींच बाबा-साहेबांना बातमी समजली. हें बघ, जामदारखान्यांतून भामिनीचे सगळे दागिने काढून तिच्या महालांत ठेव; जा लवकर. ( दासी जाऊं लागतात. ) अग ए, हार कसले गुंफायला सांगशील ?

**प० दा०**—देवांच्याकरितां हार पाहिजेत म्हणून सांगते; महिषासुरमर्दि-नीला हार घालायचे आहेत आणि तेच हार प्रसाद म्हणून ताईसाहेब धैर्यधर-जींना देणार आहेत, याकरितां हार पाहिजे आहेत, असेंच सांगूं ना माळ्याला ?

**अक्का०**—कुसुम, मला कांहींच समजत नाहीं. धैर्यधरजी का आज येथें येणार आहेत ?

**कुसु०**—हो, धैर्यधरजी येणार आहेत. बाबासाहेबांना दरबारच्या ताकिदीचें पत्र आणि धैर्यधरजींचें पत्र, दोनही यायला एकच गांठ पडली ! आणि धैर्य-धरजींना गांवाबाहेर थोडें तरी सामोरें गेलें पाहिजे म्हणून ते निघूनही गेले. हें पहा, तूं म्हणतेस त्याचकरितां हार पाहिजेत. मात्र नेहमींचे देवांचे हार असतात तसले बिनवासाच्या फुलांचे, क्षयरोगाच्या हातापायांच्या काड्यासारखे रोडलेले, तुळशीचीं पानें आणि इतर पत्री यांच्या गर्दीचे आड एखादें फूल दडून बसलें आहे असले, चालचलाऊं नकोत. कमालखानी, गेंदेबाज—

रे सा रे ग रे सा – पं ध ग ग रे ग प प — ग प ध नि ध प
ख र त अ ध मा ऽ ला ऽ ध न ज ड ज ना ऽ ऽ म द न प त ना

मृ ग रे ग – रे सा —
ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ दुखवी ॥ १ ॥

प० दा०—धैर्यधरजींच्या गळ्यांत हार पडला म्हणजे ताईसाहेबांच्या हातावाच बिळख्या गळ्यासभोंवतीं पडला आहेसें त्यांना वाटलें पाहिजे, असला हार आणतें. मग तर झालें ? [ जाते.

अक्का०—कुसुम, अगोदर मला सांग, दरबारच्या पत्रांत काय मजकूर होता ?

कुसु०—दुसरा कोणचा असणार ! धैर्यधरजींच्या शौर्यामुळें व शिस्तीमुळें उत्तराधिपती मेटाकुटीस आला, आणि महाराज ठरवतील त्या अटींवर तह करण्यास तयार झाला. उत्तराधिपतीशीं कोणच्या अटींवर तह करावयाचा हें सेनापतीसाहेबांचा सल्ला घेऊन ठरविण्याकरितां राजधानीला महाराजांनीं धैर्यधरजींना बोलावलें आहे; व या प्रसंगीं तीन चांदांची सरदारकी व पंचवीस लाखांची जहागीर लढाईतील कामगिरीबद्दल बक्षीस म्हणून बहाल करण्यांत येणार आहे. आमच्या या देशांत तीन चांदांचे चार पांचच सरदार आहेत, आणि त्या सरदारांचा जसा सन्मान गांवगन्ना लोकांनीं करायचा असतो तसाच सन्मान धैर्यधरजींचा लोकांनीं ठेवला पाहिजे, अशी पृथ्वीधर महाराजांची ताकीद आहे. ही ताकीद घेऊन पोंचते न पोंचते तोंच धैर्यधरजीही आजच येथें येणार, व दोन दिवस आमच्या वाड्यांत मुक्काम करणार, अशी वर्दी आली.

अक्का०—मग भामिनीनें हार घालण्याची आजच कां घाई ?

कुसु०—भामिनीला ही सर्व हकीगत कळल्याबरोबर तिनें बाबासाहेबांचे पाय धरले, बापलेकींचें बरेंचसें बोलणें झालें; आणि बाहेर जातांना ही अशी व्यवस्था ठेवायला बाबासाहेबांनीं मला सांगितलें. म्हणून अक्कासाहेब, मी जरा घाईत आहे.

दु० दा०—मी कोणचे दागिने जामदारखान्यांतून आणूं ?

कुसु०—भामिनीचे सर्व दागिने घेऊन ये. अमके आणि तमके याची नको तुला चौकशी.

दु० दा०—नुसत्या हिऱ्यांचा, का मोत्यांचा, का सोन्याचा, कसला जोड आणूं?

कुसु०—आतां नाहीं मला फुरसत कोणचा तें सांगायला; तूं सगळे ने. ( दासी जाऊं लागते. ) अक्कासाहेब, मला गेलें पाहिजे. बाबासाहेबांनीं सांगितलें

ाहे, महिषासुरमर्दिनीचें मंदीर लग्नमंडपासारखें सजवून ठेव म्हणून. अग ए, शी ये; तुला एक सांगायचें राहिलेंच. भामिनीच्या पायांत घालायला सांखळ्या सोन्याच्या पाहिजेत, त्या आतांच्या आतां घडवून आणा, म्हणून जामदारांना बाबासाहेबांचा हुकूम सांग.

**दु० दा०**--घडवून कशाला आणायला पाहिजेत ? बाबासाहेबांनीं कांहीं तसें नाहीं सांगितलें. थोरल्या आईसाहेबांच्या वेळच्या सोन्याच्या सांखळ्या तशाच पडल्या आहेत, त्यांना उजळा घालायला बाबासाहेबांनीं सांगितलें आहे.

**कुसु०**--हो, मी गडबडीत विसरूनच गेलें होतें ! तसेंच सांग.

[ दु. दा. जाते.

**अक्का०**--कुसुम, सोन्याच्या सांखळ्या काय म्हणून ग भामिनीला ?

**कुसु०**--काय म्हणून म्हणजे ? धैर्यधरजी तीन चांदांचे सरदार होणार ना ? राजमाता, राजकांता, व राजकन्या यांच्याप्रमाणें तीन चांदांच्या सरदारांच्या बायकांना व मुलींना सोन्याच्या सांखळ्या घालण्याचा हक्क आहे, इतर कोणाला नाहीं, हें अक्कासाहेब, आपण विसरलांत वाटतें. थोरल्या आईसाहेबांचे वडील तीन चांदांचे सरदार म्हणून त्यांच्या सांखळ्या सोन्याच्या.

**अक्का०**--आणखी असें सांग--

**कुसु०**--मला लवकर गेलें पाहिजे. बाबासाहेबांप्रमाणेंच भामिनीनेंही मला निक्षून सांगितलें आहे, अगदीं लग्नमंडपासारखें देवीचें मंदीर शोभिवंत दिसलें पाहिजे. [ जाते.

**अक्का०**--यांच्या जवळ जाऊन धैर्यधरजींना भामिनी देऊं नका, असा हट्ट धरण्याची आतां सोयच उरली नाहीं. अशा मोठ्या पदाला चढून पंचवीस लाखांची जहागीर जर धैर्यधरजींना मिळाली असली तर भामिनीनें खुशाल त्यांच्याशीं लग्न करावें. नवरा मुलगा लग्नाच्या वेळेला श्रीमंत असला म्हणजे आम्हां बायकांचें समाधान होतें.

[ पद ३०--" ना छेडोरे मतवालो " या चालीवर. ]

**गुणी दिसे धनभारें तो नवरा जनीं वनीं सर्वा धनीं पाही मनीं नारी नरा ॥ ध्रु० ॥ दे धनासि, घे सुखासि, हीच रीत, होत प्रीत, प्रेमझरा धनजलमय सारा ॥ १ ॥**

---

## प्रवेश ३ रा.

—:०:—

**स्थळ**---भामिनीचा महाल.

( भामिनी अंगावर दागीने घालीत आरशांत पहात बसली आहे. कुसुम प्रवेश करिते. )

**भामि०**—कायग कुसुम, मी केव्हांची तुझी वाट पाहत आहे, आज देखील तुला यायला उशीर व्हावाना !

३० धुमाळी चाल–ना छेडोरे मतवालो.

सा॒ग – म् प – म् प नि ध नि( रें सां)नि – म प नि ध (नि रें सां)
गु णी ऽ दि से ऽ ध न भा ऽ रे ऽ तो ऽ ध न भा ऽ रे ऽ
* – ० * ० – * –
नि ध (मंपध) ग म् (धंप) – म् गरेसा — गं – गं – रें
न व रा ऽ ज नीं ऽ ऽ व नीं ऽऽ स ऽ र्वा ऽ ध
० * – ० – * –
सां — नि – ध – नीं प — ग म् प – म् ग —
नी ऽ ऽ पा ऽ ही ऽ म नीं ऽ ऽ ना ऽ रीं ऽ न रा ऽ ऽ ॥ ध्रु० ॥
* ० – * – ० –
गं – रें गं मं गं रें गं रें सां नि सां ध नीं धं
( ताल दादरा. ) दे ऽ ध ना ऽ सि घे ऽ सु खा ऽ सि ही ऽ च
* – ० * – ० * –
प म् प ग म् प ग म् ग
री ऽ त हो ऽ त प्री ऽ त
० * – ०
नि सा ग म् प म ध ध म ग म प ग म् ग — .
( ताल धुमाळी ) प्रे ऽ म झ रा ऽ ध न ज ल म य सा ऽ रा ऽ
* – ० – * – ० –

सर्वा धनी इत्यादि.

**कुसु०**—आज मामी ग कशाला वाट पहात आहेस ? धैर्यधरजी केव्हां तील म्हणून वाट पाहत असशील झालें !

**भामि०**—म्हणूनच तूं जरा अगोदर यायला पाहिजे होतें. अग, या दागिन्यां-ले कोणचे दागीने मी आज अंगावर घालूं ? मला कांहींच सुचत नाहीं. तूं तरी सांग गडे. ही पाचूची आणि मोत्यांची माळ पदराखालून घातली तर चांगली देसेल कां शालूवरून चांगली दिसेल ? मी निरनिराळ्या तऱ्हेनें दोनदा तीनदा घालून पाहिली, कोणचें चांगलें दिसेल, हेंच माझ्या ध्यानांत येत नाही.

**कुसु०**—पण भामिनी, तुला मी अगोदर विचारतें, तुला हे दागिने ग कशाला ? रानावनांत राहणाऱ्या भोळ्या वनमालेचेच अलंकार तुला अधिक शोभतात, असे तूंच म्हणत नव्हतीस का ? धैर्यधरजीनाही दागिन्यांचा तिट-कारा; मग तुला ग कशाला हे दागीने ? फार झालें तर एखाद्या लतेचा कोमल पल्लव तूं कानावर ठेवावास किंवा एखादें फूल वेणींत घालावेंस; सांगना तुला हे दागीने कशाला ?

**भामि०**—कशाला म्हणजे ? त्यांनी जर मजशीं लबाडी केली तर मीं तरी का साधीभोळी रहावें ? नसल्या जादुगाराची खोड अशीच दागिन्यांनीं मोडली पाहिजे. मला त्यानीं का फसवावें ?

**कुसु०**—अग, धैर्यधरजी अजून यावयाचे आहेत; आणि त्यानीं तुला फस-विलें तें कसें आणि केव्हां ?

**भामि०**—आले नसले म्हणून काय झालें ? मी रात्रंदिवस त्यांना झोपेंत, स्वप्नात, जागी असतांना, एकसारखी पहात असतें. आणि इतकें असून प्रत्येक वेळेला आपले नवेच्या नवेच मला दिसतात ! माझ्या मनावर छाप बसावी म्हणून इतकीं जर निरनिराळीं सोंगें प्रत्येक क्षणाला ते घेतात, तर उलट त्यांचें मन आकर्षण करून घ्यायला आज एक दिवस तरी हे दागीने घालून होईल तितकें नटणें मला भाग नाहीं का ?

[ पद ३१—" पानी भरेली कोन " या चालीवर. ]

**पाही सदा मी परि केंवि नाथ भासे मला। नवोनव ॥ ध्रु० ॥**
**स्वरूपगर्वा, करि अदय घावा। दे भूषणसहाया हतबल-हृदया। डाव हा मांडिला ॥ १ ॥**

भग, लढाईत काय आणि प्रेमाच्या वेळेला काय, जय मिळविण्याकरितां हरएक साधनांचा उपयोग करावा; त्यांत कांहीं वावगें नाहीं. शिवाय,—स्वप्नमंदिरांतच का होइना,—तशा त्या रीतीनें दर्शनसुखाचा आस्वाद घेत असतांना, मी त्यांना म्हटलें मला दागीने कांहीं नकोत, मी एक देखील घालणार नाहीं; पण बाई एवढाले डोळे करून रागावून म्हणायचें झाले, तूं दागीने घातलेच. पाहिजेस. मग मी तरी काय करणार, कुसुम ?

**कुसु०**—अस्सं अस्सं-मग मला कशाला विचारतेस दागीने कोणचे, कसे, कोठें घालूं म्हणून ? ज्यांनीं तुला दागीनें घालायला सांगितलें, त्यांनाच विचारायचें होतेस कोणचे आणि किती घालूं म्हणून.

३१ दादरा ( चाल—पानी भरेली )

ग – ग ग ग – (सांरेंगंम्) — ग रे रे (मंग्)रे सा नी सा नी
पा ऽ हि स दा ऽ मी ऽ ऽ ऽ प रि के ऽ वि ना ऽ थ भा
* ० * ० * ० *

सा नी रें सा नि ध — नि ध नी सा ——नी सा –
ऽ सें ऽ ऽ म ला ऽ ऽ ऽ ऽ न वो ऽ ऽ न व ऽ ॥ ध्रु० ॥
० * ० * ०

नि ध ——नि सा नी सा —— ग ग ग ग ग म् – ग प म् ——
स्व रू ऽ ऽ ऽ प ग ऽऽ र्वा ऽ ऽ क रि अ द य घा ऽ ऽ ऽ वा ऽ ऽ
* ० * ० * ० * ०

ग – ग – ग ग ग ग –रें सा —— ग ग म् म् ग ग (सांरेंगंम्)ग्– रे
दे ऽ भू ऽ ष ण स हा ऽ या ऽ ऽ ह त ब ल हृ द या ऽ ऽ डा ऽ व
* ० * ० * ० * ०

नी सा नी रेंसांरें नि ध नि ध – नी सा—नी सा
हा ऽ मां ऽ ऽ डि ला ऽ ऽ ऽ ऽ न वो ऽ ऽ न व ऽ ॥ १ ॥
* ० * ० * ०

**भामि०**—मी त्यांना विचारणार होतें इतक्यांत बाई त्यांच्याशीं बोलूं नये-
| मला वाटलें !

**कुसु०**—तें कां ?

**भामि०**—हें बघ, मी माझा नेहमींचा हिरवा शालू प्रथम नेसलें होतें. शालू बरा दिसतो का म्हणून मीं विचारलें, तेव्हां हंसून सांगायचें झालें काळा लू नेस म्हणून. मग मी तो सोडून हा नेसलें; आणि विचारलें, हा आतां गिला दिसतो का? तेव्हां म्हणायचें झालें, नेसत असतांनाच तो अधिक शोभत ेता. मला नाहीं बाई आवडली असली थट्टा. मी लगेंच साफ सांगितलें—

[ पद ३२.—" हमसे ना बोलो राजा " या चालीवर. ]

**विनयहीन वदतां, नाथा, नाहीं मी बोलत आतां ॥ ध्रु० ॥**
**रणरुचिरा रीती, ना शोभे प्रेमा ती। विनयवती मी कांता ॥ नाथा ॥ १ ॥**

तव्हांपासून कीं नाहीं त्यांचें आणि माझें भाषण नाहीं. मी त्यांच्याशीं असा अबोला धरिला, याचें मला वाईटही वाटलें; कारण त्यानंतर मी कितीं प्रयत्न केला, पण त्यांची मूर्ति डोळ्यापुढें उभीच न राहिल्यामुळें त्या काल्पनिक दर्शन-

---

३२ खमाज—दादरा.

ध ग म् प प प प ध रें नि् ध नि् नीं नी नी नीं – नी सां नी सां
ना हि मि बो ल त ना ऽऽ था ऽऽ वि न य ही ऽ न व द तां
* ० * ० * ० *

नी रें सां
ऽऽ ऽ ॥ ध्रु० ॥

{ 'नाहीं मी' या सहा मात्रा अर्ध्या आवर्तनांत घ्यावयाच्या आहेत.

नी नी नी नी सां – ध नी रें सां — नीं – नी – सां—सांनीध
र ण रु चिरा ऽ री ऽ ऽ ती ऽऽ ना ऽ शो ऽ भेऽ प्रे ऽ
* ० * ० * ० *

मंग—म् ग म् ग म् प प ध – (प ध रें) नि् ध नी
मा ऽ ती ऽ वि न य व ति मी ऽ कां ऽ ता ऽ ऽ ॥ १ ॥
० * ० * ०

कुणाकडाही मी आंवचलें! म्हणून कुसुम, तुला विचारतें, ही रत्नमाळा पदराखालून असूं दे कीं वरून असूं दे ? सांग बाई लवकर.

कुसु०—एकदां वाटते पदराखालून असूं दे; एकदां वाटतें पदरावरून असूं दे. अंगांतल्या हिरव्या चोळीच्या शेजारीं ही पाचूची माळ कशीशीच दिसेल; काळ्या शालूवरच ही शोभेल. पण जर ती माळ वरून घातलीस तर ही फुलांची माला कोठें घालणार ?

भामि०—कोठें म्हणजे ? त्यांच्या गळ्यांत.

कुसु०—हां, खरें, मी विसरलेंच. पहा ही माला तुझ्या मनाजोगती झालीना ? तुझें हृद्गत धैर्यधरजींना कळविण्याला ही बिलकूल कसूर करणार नाहीं.

भामि०—एवढी मोठी, इतकी ऐटबाज, आणि जरतारांनीं नटविलेली कशाला ग ही माळ आणलीस ? अग, या असल्या माळेचें कसब तुला माहीत नाहीं. प्रियकराला निरोप कळविण्याकरितां असल्या मालेला पाठविलें, आणि मजसारख्या साध्याभोळ्या मुलींना तोंडघशीं तिनें पाडलें नाहीं, असें आजपर्यंत कधीं झालें आहे का ?

[ पद ३३.—" दर्जन मै ना भई " या चालीवर. ]

**सवतचि भासे मला । दूती नसे ही माला ॥ ध्रु० ॥**

**मच पकांतीं सोडी नाथा, भेटूं न दे हृदयाला ॥ १ ॥**

मला नाहीं आवडत ही माला! ( फेकून देते. )

३३ जिल्हा, दादरा.

ग — ग -- म् ग — रें सा रेगम्गरे नी सा नी — ग म् गं रे
दू ऽ ऽ ती ऽ न से ऽ ऽ ही ऽऽ मा ऽऽ ला ऽ ऽ स व ऽ त
* ० * ० * ० * ०
सा — सांरे ग गंम् ग नीं सा———
चि ऽ भा ऽऽ से ऽ म ला ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ॥ ध्रु० ॥
* ० * ०
सा रे — म् — म् प ध प — रेम् प ध म् — रेंग रें सा —
व च ऽ ए ऽ ऽ कां ऽ ऽ तीं ऽ ऽ सो ऽ ऽ डी ऽ ऽ ना ऽऽ था ऽ ऽ
* ० * ० * ० * ०

[ पुढें चालू

कुसु०—अग हें काय भामिनी ? धैर्यधरजींच्या गळ्यांत घालण्याकरितां आणली आहे हो !

भामि०—मी ही माळ त्यांच्या गळ्यांत घालायचीच नाहीं. महिषासुर-मर्दिनीच्या रोजच्या पूजेला असते तसली साधी, थोड्या फुलांची, आणि बेल पत्रींचीच माळ मी त्यांच्या गळ्यांत घालीन. अग, देवतांना आणि प्रिय-जनांना तसलीच माळ अर्पण केली पाहिजे. माळेंतच जर देवाचें मन गुंतून राहिलें तर मग भक्ताकडे कसची दृष्टि वळणार ? [ विनोद येतो.

विनो०—ताईसाहेब, बाबासाहेब, धैर्यधरजी, वगैरे सर्व मंडळी इकडेच येत आहेत, बाबासाहेब म्हणाले, प्रथम या महालांत बसूं आणि मग महिषासुर-मर्दनीच्या दर्शनाला जाऊं.

कुसु०—होय गडे; मजपाशीं देखील बाबासाहेब असेंच सकाळीं म्हणाले होते; आणि तें तुला सांगण्याकरितांच मी येथें लगबगीनें आलें.

भामि०—आणि तें आतां सांगते आहेस ! बरी आठवणीची धेंड आहेस ग !

कुसु०—अग, तुझ्या त्या काल्पनिक प्रेमकलहाचे प्रवाहांत मी वाहत गेल्या-मुळें मला भानच राहिलें नाहीं. विनोदा, उचल ही पेटी, हा आरसा उचल, आणि ने हें सगळें पलीकडच्या महालांत.

भामि०—अरे, उचल लवकर. चल त्या महालांत. कुसुम, अजून किती तरी दागीने घालायाचें राहिले आहेत. आतां माझ्या अंगावर चटचट सगळे दागीने घाल हं; असेंच कां, तसेंच कां म्हणून विचारांत बसूं नकोस. [ भा.व कु.जातात.

विनो०—अरे, या आपल्या तशाच हात हालवीत गेल्या ! एखादा दुसरा तरी जिन्नस उचलून न्यायाचा होता ! श्रीमंतांच्या मुली, इकडची काडी तिकडे करतील तर शपथ ! मी सांगायला आलों धैर्यधरजी आले म्हणून तें मलाच

---

सांरेम् — म् — म् ग — सांरेग म् ग नी सा— नी —
मे ऽऽ हू ऽ न दे ऽऽ ह ऽ द या ऽ ऽ ला ऽ ऽ ॥
* ॰ * ॰ * ॰

स्वतन्हि भासे मला.

यांनां बठीला भग्ले. अरे हे आलेच; नेलें पाहिजे सगळें. ( दागीनें वगैरे घेऊन जातो. धैर्यधर, शीलधर, विलासधर, बाबासाहेब व लक्ष्मीधर येतात. ) *

**धैर्य०**—आमच्या पृथ्वीधर महाराजासारखे उदार पुरुष क्वचितच दृष्टीस पडतात. त्यांनीं मला जी पंचवीस लाखांची जहागीर व तीन चांदांची सरदारकी दिली, ती त्यांच्या उदार स्वभावाचें फल होय. रणांगणावर मीं असें कोणतें शौर्य दाखविलें कीं त्याबद्दल त्यांनीं मजवर असें प्रसन्न व्हावें ?

**बाबा०**—माझ्या हिशोबानें जर विचाराल तर आपण बजावलेल्या कामगिरीच्या मानानें पंचवीस लाखांची जहागीर कमीच होय.

**शील०**—तीन चांदाच्या सरदारकींत नांव घातलें हें योग्यच झालें, पण तीन चांदांच्या सरदारांना जेवढी जहागीर असते, तेवढी सेनापतीसाहेबांना मिळावयाला पाहिजे होती.

**बाबा०**—महाराजांनीं आपणाला पन्नास लाखांची जहागीर देऊं केली होती, आणि आपण ती घेण्याचें नाकारलें, असें म्हणतात, तें खरें का ?

**धैर्य०**—महाराजांनीं मला पन्नास लाखांची जहागीर देऊं केली होती, हें खरें आहे. पण मींच नको म्हणून सांगितलें. मला पन्नास लाख घेऊन करायचें काय ?

**लक्ष्मी०**—( स्वगत ) दौलत मिळाली तरी ती खर्च कशी करावी हें समजायला पीढाजाद श्रीमंतां असावीं लागते !

**धैर्य०**—महाराजांनीं एकंदर एक कोटीचें उत्पन्न ह्या प्रसंगीं सैन्यांत वांटण्याकरितां काढलें होतें; त्यांत पन्नास लाखांचें मीं घ्यावें व पन्नास लाख सैन्यांत वांटावें अशी नोंद झाली. मी माझ्या हाताखालच्या लोकांची कामगिरी तपासून पाहूं लागलों तों माझ्याहून प्रत्येकानें अधिक शौर्य दाखविलेलें; तेव्हां सगळेंच कोटीचें उत्पन्न सैन्यांत वांटून दिलें. सेनापतीनें शूर सैनिकांचें पूजन अशा रीतीनें प्रथम करणें फार जरूर असतें.

[ पद ३४.—" दुःखा मी जन्मलें " या चालीवर. ]

**शूरा मीं वंदिलें । धारातीर्थीं तप तें आचरती. सेनापति यश याचि बलें ॥ ध्रु० ॥ शिरकमला समरीं अर्पिती. जनहितपूजन वीरा सुखशांती । राज्य सुखी या साग्रुमुळें ॥ शूरा मीं वंदिलें ॥ १ ॥**

३४ ( 'दुःखा मी जन्मलें' या चालीवर—त्रिताल )

सां – (नीधनि॒) नि॒ ध (पध) म॒ रे ग म॒ ——— म॒ – (नि॒धनी)
शू ऽ रा ऽ मीं ऽ ऽ वं ऽ दि लें ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ धा ऽ रा ऽ

*

[ पुढें चालू

**विला०**—सैन्याच्या करामतीवरच सेनापतीचा मोठेपणा अवलंबून असतो; तेव्हां आपण त्यांचें पूजन प्रथम केलें, हें योग्यच झालें.

**शील०**—अहो, खरें बोलायचें म्हणजे सेनापतीच्याच करामतीवर सैन्याचें शौर्य अवलंबून असतें. शरीराला जसे डोळे, तसा सैन्याला सेनापती. सेनापती जर चांगला नसला तर सैन्याचें शौर्य अंधळें होतें आणि तेव्हांच एखाद्या खड्यांत पडतें.

**बाबा०**—ही कशाला वाटाघाट ? धैर्यधरजी, खरें सांगतों, आपणाला तीन चांदांची सरदारकी मिळालेली पाहून मला मनापासून आनंद झाला. तीन चांदांचे सरदार आमच्या राज्यांत तीन चारच उरले आहेत, आणि त्यांचीं घराणीं पराक्रमांत आतां मावळल्यासारखीं झालीं आहेत. तेव्हां तीन चांदांच्या एका नवीन देदीप्यमान घराण्याचा प्रारंभ आपल्यापासून होत आहेसें पाहून कोणाला आनंद होणार नाहीं !

सां – सां – नीं सां ( रें सां नि ) – म् प नी सां रें गं ) रें सां
ती ऽ थीं ऽ त प ते ऽ ऽ ऽ ऽ आ ऽ ऽ ऽ ऽ च र

( रें मां नि ) म् प (नी सां रें ) रें सां सां रें ध नि ध प(म्पध–प)
तीं ऽ से ऽ ना ऽ प ति य श या ऽ चि व ले ऽ ऽ

म् रे ग ( धपम्गम् ) म्——
वं ऽ दि ले ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ शूरांना ॥ ध्रु० ॥

ग म् ध नि सां – नीं नी सां – मां – ( रें सां नीमां ) नि ध नीं नी
शि र क म ला ऽ स म रीं ऽ अ ऽ र्पी ऽ नां ऽ ज न

सां सां रें गं रें सां रें नी – सां — नि ध नि ध – (सांनीधप) प–
हि त पू ऽ ज न वीं ऽ ऽ रा ऽ ऽ मु ख शा ऽ ऽ नां ऽ ऽ रा ऽ

रें रें सां – (नीसां रें) सा नि ध प (म्पधपं) (म्गं) रे ग म्
ज्य मु खी ऽ या ऽ सा ऽ भु मु ळें ऽ ऽ वं ऽ दि ले ॥ १ ॥

**धैर्य०**—बाबासाहेब, मजवरील आपल्या प्रेमामुळें आपणाला तसें वाटतें. अशा प्रेमळ स्नेह्याची संगत, हेंच जगांत सर्वांत मोठें सुख आहे. बाबासाहेब, पांच वर्षांपूर्वी या लढाईस जेव्हां सुरवात झाली, त्या वेळचे छावणींतले आपले दिवस आठवतात काय? त्या वेळीं आपल्या हाताखालीं मी प्रथम सैन्यात दाखल झालो. युद्धाचीं पहिलीं तीन वर्षे आपण रणांगणावर असतांना मजवर एकसारखें प्रेम केलेंत; पुढें शरिराला स्वस्थता न राहिल्यामुळें आज दोन वर्षे घरीं बसल्यावरही माझ्या पराक्रमाचें कौतुक करण्यात व मला द्रव्याची मदत करण्यात आपण धन्यता मानलीत. बाबासाहेब, गेलीं दोन तीन वर्षे मी विचार करितों आहे, असें अकृत्रिम प्रेम आपण मजवर करण्याचे कारण काय ? पूर्वजन्मीचा लागाबादा याशिवाय मला तर दुसरें कारण सापडत नाहीं. बाबासाहेब,आपल्या प्रेमाचीं फेड मी कशी करूं, ते मला सांगा. या प्रश्नाचें उत्तर आपल्या तोंडून एकण्याकरितांच पृथ्वीवर महाराजांचें दर्शन घेण्यापूर्वी मी येथें दोन दिवस मुक्काम केला आहे. सांगा, मोकळें मन करून सांगा, मी आपले कोणाचें हित करूं, महाराजाकडून आपणाला किती ची जहागीर देववूं, कोणचा किताब देववूं . सांगा.

**बाबा०**—धैर्यधरजी, हल्लीं आहे याहून अधिक जहागिरीचीही मला जरूरी नाहीं. आणि कोणच्या किताबाचीही मला इच्छा नाहीं. कोणचे हित करूं म्हणून विचारता, जर एवढीच विनंती आहे, माझी मुलगी भामिनी—

**विला०**—हं हं बाबासाहेब, हें काय भलतेंच ! भामिनीनें पूर्वी सेनापतीसाहेबांचा अपमान केलेला विसरलांत वाटतें! तिचे नांव काढूं नका यांच्यापुढें, सेनापतीसाहेबांना राग येईल.

**लक्ष्मी०**—बाबासाहेब, ती पूर्वीची आठवणच नको. भामिनीनें धैर्यधरजींना दिलेल्या शिव्यांची आठवण आली म्हणजे सेनापतीसाहेब रागानें त्या दिवशींसारखे निघून जायचे !

**बाबा०**—आपण जरा गप्प बसा. धैर्यधरजी, माझी एवढीच विनंती आहे. त्या दिवशीं माझ्या मुलीनें आपला केलेला अपमान विसरून जा; त्या दिवशीच्या अल्लडपणाबद्दल तिलाही आतां फार वाईट वाटत आहे तेव्हां पूर्वीचें

सगळे विसरून भामिनीला पदरांत घेऊन पवित्र करा; एवढेंच आपल्यापाशीं मागणें आहे.

धैर्य०—बाबासाहेब,

[ पद ३५.—" सुगर पिया प्यारी " या चालीवर. ]

**धनिकसुता कांता न योग्या मला । समरप्रीति गमे सवत तिला ॥ कांता ॥ ध्रु० ॥ धनिकसुतागर्व हराया । समरभू दे विजया ॥ १ ॥ करिन सुखी अधना बाला । तरिच वशा युद्धकला ॥ २ ॥**

३५ ( 'शुगरपिया' या चालीवर—दादरा. )

प प प प प – ग प म् — म् ग रें सां सांरेंग – ग ग —– रेंसा
ध नि क सु ता ऽ कां ऽ ता ऽ ऽ न यो ऽ ऽ ग्या ऽ म ला ऽ ऽ ऽ ऽ ऽ
* - o * o * - o * - o

नि् नि् धपं प प – (म्पनि् – पंध ) म् — म् | म् म् म्
ध नि क सु ता ऽ का ऽ ता ऽ ऽ न योग्यामला | स म र
* - o * - o * -

प — (गम्पधनीसां) सां (ध सां—नि्धप) नि् नि् नि नि् नि्ध पं
प्री ऽ ऽ ती ऽ ऽ ऽ ऽ ऽ ग मे ऽ ऽ ऽ ऽ ऽ स व त ति ला ऽ
o * o - o * - o

प ध ग म् — म्
कां ऽ ता ऽ ऽ न योग्या ... ... ॥ ध्रु० ॥
* - o

म् म् म् म् प -- ( पनिंध प म् ( गम्पधनीसां ) सा —— नि् नि्
ध नि क सु ता ऽ ग ऽ र्व ह रा ऽ ऽ या ऽ ऽ ऽ ऽ ऽ स म
* - o * - o * o *

नि् नि् (धनि्धपं) (पधपं) ग म् प – म् म् म् म् प – प निंध
र ण भू ऽ दे ऽ वि ज या ऽ ॥१॥ क रि न सु खी ऽ अ ध ना
- o * - o * - o *

प म् (गम्पधनींसा)सां— नि् नि् नि् नि् (धनि्धपं) (पधपं) ग म्
बा ऽ ला ऽ ऽ ला ऽ ऽ ऽ ऽ ऽ त रि च व शा ऽ यु ऽ द्ध क
- * - o * - o * -

प —
ला ऽ ॥ २ ॥

बाबासाहेब, माझी पंचवीस लाखांची जहागीर मागा. ती मी तुम्हांला देतों; तीन चांदांची सरदारकी मागा, माझ्या मस्तकावर ठेवण्याकरितां पृथ्वीपति महाराजांनीं तीन चांदांची पगडी पुढें केल्यावर ती तशीच्या तशी आपल्या मस्तकावर ठेवतों. पण आपल्या मुलीचें पाणिग्रहण करण्यास मला सांगूं नका. कारण त्या दिवशीं 'धनी मी पति वरिन कशी अधना' हे तिच्या तोंडचे शब्द जेव्हां माझ्या कानांत पडले त्याच वेळीं मीं निश्चय केला, करीन लग्न तर एखाद्या गरिबाच्याच मुलीशीं करीन.

[ पद २६—" दुःखी जन्म दवडिसी " या चालीवर ]

धिःकार मन साहिना ॥ ध्रु० ॥ अपमानशल्य तें। विषसमचि जीघना ॥ अजर जणुं भासते। कुवचनें ताडना ॥ १ ॥ चढवीन विभवा। अधनाचि ललना। हा मार्ग बरवा। मानापमाना ॥ २ ॥

२६ ( अडाणा, झंप. )

प – सां सां नि् प प(म्प) (म्पनि्) प ग् ——— रे—सा— नि् सा
धिःऽ का ऽ र म न सा ऽ हि ना ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ अ प
* ० – * ० – *
मग् –(गंम्) प – प ध् – नि् नि् सां सां सा नि्(सांरें)सां(निंध)–प
मा ऽ न श ऽ ल्य तें ऽ वि ष स म चि जी ऽ घ ना ऽ
० – * – ० –
नि् सां मं् गं मं् रें -- नि् सां – सां नि् नि् सां – नि् सांरें सा
अ ज र ज णुं भा ऽ स ते ऽ कु व च ने ऽ ता ऽ ड
* – ० – * – ० –
निं् प
ना ऽ ॥ ध्रु० ॥
म् प ध् नि् नि् सां सां सां — नि् सां रें –(रें सां) नि् सां धनि्ध
च ढ वी ऽ न वि भ वा ऽ ऽ अ ध ना ऽ चि ल ल ना ऽ ऽ
* – ० – * – ० –
सां – मंगं – मं् रें रें सां —(निंसां)— सां – सां ( निंसांरें सां)
हा ऽ मा ऽ र्ग ब र वा ऽ ऽ मा ऽ ना ऽ प मा
* – ० – * – ०
नि् प —
ऽ ना ऽ ऽ ॥ १ ॥

नको बाबासाहेब, या कामीं मला आग्रह करूं नका. शीलधरजी, माझें नशीबच कांहीं चमत्कारिक दिसतें; यांच्या घरीं यायची ही माझी दुसरी खेप, या वेळींही यांचें मन दुखविण्याचें माझ्या कपाळीं आलें आहे. दोन दिवस आपल्या प्रेमांत सुखानें जातील म्हणून येथें आलों तों पहिल्याच भेटीला हा असा प्रकार! नका, बाबासाहेब अशा दीन मुद्रेनें मजकडे पाहूं नका. मी करितों आहे हें बरोबर आहे, असें कांहीं दिवसांनीं तुमच्याही लक्षांत येईल. शीलधरजी, आतां या वाड्यांत रहावेंसें मला वाटत नाहीं. गावाबाहेरच्या अंबराईत आज डेरे द्या, आणि उद्यांच येथून आपण पुढें कूच करूं. बाबासाहेब, आपल्या वाड्यांतील महिषासुरमर्दिनीचें दर्शन घेऊन मला येथून जाण्याची परवानगी असावी. चला, शीलधरजी देवीच्या दर्शनाला जाऊं. [ शीलधर व धैर्यधर जातात.

बाबा०—असा दुःखाचा प्रसंग मजवर यापूर्वी कधींच आला नव्हता.
[ जातो.

विला०—औषधावाचून खोकला गेला! लक्ष्मीधरजी, आतां भामिनी तुमची.

लक्ष्मी०—माझ्याशिवाय आतां तिला कोण नवरा मिळणार?
[ विला० व लक्ष्मी० जातात.

( भामिनी व कुसुम प्रवेश करितात. )

भामि०—कुसुम, मला आज केवढी आशा वाटत होती, सुखाचे पर्वताचे शिखरीं पोंचल्यासारखें मला झालें होतें; पण आतां एकदम त्या शिखरावरून खालीं ढकलून दिल्यासारखें मला झालें आहे! नाहीं, अजून मला आशा आहे. गरिबाच्या मुलीशीं लग्न करण्याचा त्यांचा निश्चय आहेना? मीच ती गरिबाची मुलगी कां होऊं नये! कुसुम, चल आपण पुन्हा गरीब वेष धारण करूं. तूं पुन्हा पुष्पमाला हो आणि मी वनमाला होतें; चल, रणांगणाशेजारच्या तुझ्या त्या बागेंत आपण रहावयाला जाऊं. त्या दागिन्यांचें प्रकरण पृथ्वीवर महाराजांच्यापर्यंत नेण्याच्या मिषानें सेनापतीसाहेबांच्या छावणींत आपण जाऊं, आणि विजयी सैन्य ज्या वेळीं राजधानीकडे जाईल त्या वेळीं सैन्याबरोबर राहून गरिबाच्या मुलींच्या वेषांत धैर्यधरजींचा लोभ संपादन करूं. कुसुम, हे दागीने माझ्या अंगावरचे काढ आणि मला आतांपासूनच गरिबाची मुलगी होऊं द्या. या मेल्या दागिन्यांनींच आज मला अपशकुन केला. दागिन्यांच्या या हौसेला मी या पुढें कधीं वर डोकें करूं द्यायची नाहीं. व्हा मेल्यांनो, तुम्ही माझ्यापासून दूर, आणि होऊं द्या मला एकदाची गरिबाची मुलगी.

[ पद ३७—" चालो ठाकुरमा " या चालीवर. ]

अजि टाकु गडे धनवेषा । मग तोडू अलंकारा या पाशा ॥ ध्रु० ॥ धनसुख कार्यनाश करी त्या धनवासा मी स्वीकारीं । कार्या तनमनधन करि अर्पण याचोगेंचि अयाशा ॥ १ ॥ [ पडदा. ]

[ तिसरा अंक समाप्त. ]

---

३७ ( जोगी—मांड, ताल दीपचंदी. )

प ध पध नी सा – निं ध प म् – ग रे सा सा ध सा —
अजि टा ऽ ऽ ऽ ऽ कु ग डे ऽ ऽ ऽ ऽ ध न वे ऽ ऽ
* – ० – *

सा ——————— सा सा रे म् —— म् म् प —— पध
षा ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ म ग तो ऽ ऽ ऽ डु अ लं ऽ ऽ का
– ० – * – ० –

(पधरें सांनीधंपध) प ——— (प ध सां रें गं—सां)
ऽ ऽ ऽ ऽ रा ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ या ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
* – ० –

नी रें सां नी – ध—प ध प – मंग
पा ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ शा ऽ ऽ अजि टाकु ॥ ध्रु० ॥
* – ० – *

प – ध् ध् – ध् ध् ——— प ध् ——— ध् ध् सां ——
ध ऽ न सु ऽ ख का ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ र्य ऽ ना ऽ ऽ ऽ ऽ श क री ऽ ऽ ऽ
* – ० – * – ०

सां —— प ध् – सां ——गं रें ——— सां – सां नी ——
त्या ऽ ऽ ध न ऽ वा ऽ ऽ ऽ सा ऽ ऽ ऽ ऽ मी ऽ स्वी ऽ ऽ
– * ० – *

ध ——————— प —— ग – म् ध् —— नींसां – सां —नींसां –
का ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ री ऽ ऽ का ऽ ऽ र्या ऽ ऽ ऽ त ऽ न ऽ म ऽ
– ० – * – ० –

सां – पध्—नी – सां – रे – नी सां – सां —— सां ——
न ऽ ध न ऽ क ऽ रि ऽ अ ऽऽ र्प ऽ ण ऽ या ऽ ऽ चो ऽ ऽ ऽ
* – ० – * –

सां —नी – ध ध प – धं ——— प ध नि् धप
गें ऽ ऽ ऽ ऽ चि अ या ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ शा ऽ ऽऽ ऽ अजि टाकु० ॥ १ ॥
० – * – ० – *

# अंक चौथा.

## [ प्रवेश १ ला. ]

**स्थळ**—धैर्यधराचा तं...

( शीलधर व दोन नोकर प्रवेश करितात. )

**शील०**—अरे, तुम्हीही जर रजा मागूं लागलां तर सेनापतीसाहेबांच्या खास दिमतीला रहायचें कोणीं? मालकानें आपलीं खासगी कामें स्वतः करावींत आणि मौज करायला तुम्हीं घरीं जावें, हें चांगलें दिसतें का?

**प० नो०**—सगळ्यांना रजा मिळावी आणि आम्हीं तेवढें येथें अडकून रहावें, हा जुलूम नव्हे काय?

**दु० नो०**—आमचे सेनापतीसाहेबांना तीन चांदांच्या सरदारीचा पोषाख मिळून ते परत आले, याकरितां सर्व सैन्यांत आनंदीआनंद झाला असून सेनापतीही खूष झाले आहेत; त्यांच्या तीन चांदांच्या नव्या पगडीला सर्व सैन्याची सलामी झाल्यावर ज्याला घरीं जायची इच्छा असेल त्याला एक महिन्याची रजा द्यावी—

**प० नो०**—आणि घरीं गेलेल्यांनीं सर्व लष्कर राजधानीला पोंचावयाच्या आधीं तीन मुक्काम पुनः हजर व्हावें, असा त्यांनीं हुकूम सोडला आहे. अहो, या लढाईत पांच वर्षे आम्हीं लढलों, परमेश्वराच्या कृपेनें जगलों, वांचलों—

**दु० नो०**—आतां एक महिना घरीं बसून बायकामुलांचें तोंड सुखानें पाहूं या.

**शील०**—माझ्याही मनांत हा महिना घरीं काढावा असें आहे. तहावर सह्या झाल्या, शत्रूला आम्हीं रामराम ठोकला, रणमैदान सोडून तीन चार मुक्काम अलीकडेही आलों; लष्कर एका रस्त्यानें राजधानीकडे जाणार; आणि सेनापतीसाहेबांची सडी स्वारी दुसऱ्याच रस्त्यानें त्यांच्या जन्माचे गांवांत कांहीं दिवस राहून नंतर राजधानीकडे जाणार; तेव्हां म्हणतों त्यांच्या अवळ्यीं

सगळींच माणसें जर रजा मागूं लागलीं तर मला महिनाभर घरीं स्वस्थ कसें बसायला मिळेल ? मला पाहिजे तर आपलपोट्या म्हणा, पण स्वतःला रजा मिळण्याच्या अगोदर मी कांहीं तुमची शिफारस करणार नाहीं.

प० नो०—तुमची शिफारस नसली तरी चालेल; पण अडथळा मात्र करूं नका. महाराजांच्या बरोबर हल्लीं असलेल्या वनमालेकडे आम्हीं वशीला लावला आहे-

दु० नो०—आणि तुम्ही गेलां तरी तुमचीं कामें मी संभाळीन, असें तिनें आम्हांला सांगितलें आहे. ती पहा वनमालाच इकडे येत आहे.

[ भामिनी, कुसुम, व विनोद येतात.

प० नो०—आम्हीं केलेल्या विनंतीप्रमाणें आम्हांला रजा मिळाली ना ?

भामि०—बरें भेटलां, मी तुम्हांला हेंच सांगणार होतें. कांहीं हरकत नाहीं; तुम्ही रजेवर जा. बरे पण मला अगोदर सांगा, तुमच्याकडे रोजचें काम कोणचें असतें ?

प० नो०—माझ्याकडे महत्त्वाचें असें कोणचेंच नाहीं; सेनापतीसाहेबांच्या पोषाखाची व्यवस्था ठेवावयाची, इतकेंच.

भामि०—हीं सगळीं कामें मी संभाळीन. तुमच्याकडे कोणचें काम आहे ?

दु० नो०—याच्या कामाला मी थोडी मदत करतों—

भामि०—ही पुष्पमाला आहे माझ्या मदतीला—

दु० नो०—शिवाय मुदपाकखान्यावर मला देखरेख ठेवावी लागते.

विनो०—सर्व खाद्यपेयांचा कबजा मी एकटा संभाळतों. जा, सेनापतीसाहेबांसुद्धां तुम्ही सगळे खुशाल जा रजेवर; मी एकटा खाद्यपेयांचें काम संभाळतों.

प० व दु०—मग आमच्या अर्जासंबंधानें कोणची आज्ञा झाली ?

भामि०—जा, तुम्ही आजपासून रजेवर जा.

प० व दु०—परमेश्वर तुमचें कल्याण करो. येतों आम्ही. रामराम शीलवरजी. [ जातात.

शील०—मी म्हणत होतों, मी देखील एक महिना रजेवर जाईन. कामाची व्यवस्था कशी लावावी या फिकिरींत—

भामि०—तुमच्याकडे कोणचें काम असतें ?

**शील०**—मजकडे अमकें असें कोणचेंच नाहीं. नेहमीं सेनापतीसाहेबां-जवळ असायचें आणि पडेल तें काम करायचें.

**भामि०**—हें काम फार कठीण! आम्ही गरीब माणसें; काबाडकष्टाचीं दोन कामें आम्ही सहज करूं; पण थोर पुरुषांची मर्जी कशी खुष ठेवावी, हें आम्हांला कसें साधणार!

**शील०**—अहो, मी आज तीन वर्षें यांच्या जवळ नोकर आहें; पण एक दिवस काहीं मला यांची मर्जी सुप्रसन्न करतां आली नाहीं. आमचें काम त्यांच्या पसंतीला उतरायला त्यांच्या इतकी कर्तबगारी आमच्या अंगीं हवी ना! पण मला जी गोष्ट तीन वर्षांत साध्य झाली नाहीं तीच गोष्ट आपणाला तीन दिवसांत साधली! मला वाटतें, धैर्यधरजींची मर्जी कशी प्रसन्न करायची हें आपल्यापासून आम्हाला शिकलें पाहिजे.

**विनो०**—ही विद्या शिकून येत नसते; तसेच गुण अंगीं असावे लागतात.

**शील०**—म्हणून म्हणतों, शीलधरजी गेले तरी हरकत नाहीं, असे शब्द जरी ओझरते आपण उच्चारले तरी रजा मिळेल, आणि बायकामुलांत दोन दिवस घालवायला मिळतील.

**भामि०**—तुम्ही जातच असलां तर माझी कांहीं हरकत नाहीं. मला थोडेंसें अधिक काम पडल्यानें तुमचीं बायकामुलें जर सुखी होणारीं असतील तर त्यांच्या सुखाच्या आड मी कशाला येऊं!

**शील०**—बरें तर, कामाची अशी अशी व्यवस्था केली आहे, असें सरकारच्या कानावर घालून मी आजपासूनच रजेवर जातों. मजवर आपले फार उपकार आहेत. [ जातो.

**कुसु०**—भामिनी—

**भामि०**—पुष्पमाले, हें ग काय! केवढ्या मोठ्यानें 'भामिनी' म्हटलेंस! माझें नांव वनमाला; विसरूं नकोस हो.

**कुसु०**—अग, आम्ही तुझ्या माहेरच्या मैत्रिणी; तुझें सासरचें नांव आमच्या जिभेला चटकन कसें येणार!

**विनो०**—माहेरच्या माणसांनी माहेरच्या नांवानें हांक मारावी, सासरच्या माणसांनी सासरच्या नांवानें हांक मारावी.

**भामि०**—सासर आणि माहेर, इतक्यांत रे कसले करीत बसला आहेस ! कुसुम, विनोदाप्रमाणें तुलाही भलत्याच वेळीं थट्टा आठवूं लागली वाटतें ?

**कुसु०**—भलत्याच वेळी कसे वनमाले ? अग, धैर्यधरजींना न विचारतां तूंच जर आपल्या अक्त्यारीत पाहिजे त्यांना रजा देऊं लागलीस, तर मालकिणीचा हुद्दा तुझ्याकडे आला, असें मला कां वाटूं नये ?

**विनो०**—मला देखील असाच भास झाला. मला वाटलें, ह्या नोकरचाकरांची ब्याद दूर करायला ताईसाहेब अगदी उतावळ्या झाल्या आहेत ! कुसुम, तूं आणि मी दोघेही दोन चार दिवसांत डोळ्यांत खुपूं लागूं, आणि आम्हांला हाकलून देण्यात येईल हाकालण्यापेक्षा आपणच रजा घेतलेली बरी; म्हणून ताईसाहेब, विनंति करतो, मलाही महिना दोन महिन्यांची रजा मिळावी. मजकडे फारसे काम नाही; धैर्यधरजींना केव्हा केव्हां हंसवायचें इतकेंच; आणि आपण जवळ असल्यावर त्यांचें नेहमीच हास्यमुख असतें, तेव्हां निराळ्या खुषमस्कऱ्याची आतां कांहीं जरूर नाहीं

**भामि०**—इतकी खुषमस्करी पुरे झाली. ते दोघे आजपासून रजेवर जाणार आहेत, त्यांचीं कामें, विनोदा, नीट समजावून घे, जा. थट्टेशिवाय दुसरें कांहीं तरी शीक, जा. [ विनोद जातो.

**कुसु०**—खरेंच वनमाल, ह्या नोकरचाकरांना तूंच रजा दिलीस म्हणून धैर्यधर तुझ्यावर रागावले तर ?

**भामि०**—कांहीं नाहीं रागवायचे.

**कुसु०**—मला गडे भीति वाटते; ते रागावले म्हणजे सगळेंच काम बिनसून जायचें. गरिबांच्या मुली होऊन, या प्रवासांत त्यांच्याबरोबर राहून, सेवाचाकरी करून, त्यांची मर्जी संपादन करण्याचे आमचे सगळे उद्योग अशा एखाद्या अविचाराने एकदम फसायचे.

**भामि०**—इतकी नको धास्ती बाळगायला. मला वाटते माझी छाप त्यांच्या मनावर हळुहळू बसत चालली आहे. या प्रेमाच्या हट्यांत मला कितपत यश

आलें, हें अजमावून पाहण्याकारितांच त्यांना न विचारतां या नोकरचाकरांना मीं रजा दिली आहे; प्रियकराची धनदौलत व अधिकार थोडा थोडा वापरप्यास सुरवात करावी, म्हणजे दोघांच्या हृदयांतील प्रेमतरंगाच्या तारांचा जोड एक सुरांत लागला आहे कीं नाहीं, हें तेव्हांच समजतें.

**कुसु०**—तें पहा बाई तुझें तूं. पण तुझ्या अंगांत पाचपेंच कांहींच नाहींत. म्हणतात ना, सेवाधर्म फार गहन; तूं भलत्याच वेळीं भलतेंच वडबडत राहशील, आणि ज्या वेळीं बोललेंच पाहिजे त्या वेळीं मुकीच होशील;—

**भामि०**—कुसुम, तूं नको ग करूं काळजी.

[ **पद ३८**– " वदना प्राणसखी " या चालीवर. ]

**मजला प्रेम सदा तें सुचविल योजना ॥ ध्रु० ॥ रसना मूक तरी बोलवील नयना । करुनी कंठ मधुर रुचविल मम जल्पना ॥ १ ॥**

३८ राग जिल्हा, दादरा.

नी सा ग म् (पधनि्) प ध प – (गपगपधसांनी) प ध प ध मंग–
म ज ला ऽ प्रे ऽ म स दा ऽ तें ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ सु च वि ल यो ऽ
— ० * — ० * — ० * — ०

प म् ( रेगम्– गम्गरेसा)
ज ना ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
* — ० *

ग म् ग म् (पध) (सांनि्) ध नि् ध – म् – ध प (धनि्) ध प ध
र स ना ऽ मू ऽ क त री ऽ बो ऽ ल वी ऽ ल न य
— ० * ० * — ० *

मप ——— सा सा ग म् (पध) रे सा, ( नीध ) ध म् म् म् प
ना ऽ ऽ ऽ ऽ ऽ क रु नी ऽ कं ऽ ठ म धु र रु च
— ० * — ० * — ० *

ग म् ग ( रेसा) (सारेग) म् गरे सा ———
वि ल म म ज ऽ ल्प ना ऽ ऽ ऽ ऽ ॥ १ ॥
— ० * — ० *

**कुसु०**—आणखी असें, या सगळ्यांना रजा दिल्यानें तुलाच फार काम पडणार; तुझ्या या कोमल देहाला इकडची काडी तिकडे ठेवायची संवय नाहीं; तुझ्या हातून कामकाज धड व्हायचें नाहीं, आणि ते रागावल्याशिवाय रहा. यचे नाहींत.

**भामि०**-अग, मी एकटी सगळीं कामें करून त्यांना तेव्हांच सुप्रसन्न करीन

[ **पद ३९.**—" चकमक हाले मोरी नैंना " या चालीवर. ]

**मधुरस प्रेमें सेवि पाया । मिळवाया जय ॥ ध्रु० ॥ वीरा**
**जिकी प्रीतिसुयोगें प्रबला कोमल काया ॥ सेवि पाया ॥१॥**

[ जातात.

## प्रवेश २ रा

**स्थळ**—धैर्यधरजीचा तंबू.

( धैर्यधर सरदारीच्या पोषाखांत प्रवेश करितो. )

**धैर्य०**—मी आज इतकीं वर्षे सेनापतीचें काम पाहत आहें, पण आजच्या इतक्या चुका माझ्या हातून कधींच झाल्या नाहींत. पडल्या फळाची आज्ञा

---

३९ राग पिलु, कवाली.

नी सा ग म् ग म् प प म् प ध प ग म् ग – ग म् (गम्प) ग् –
म धु र स प्रे ऽ मे ऽ से ऽ ऽ वि पा ऽ या ऽ मि ळ वा ऽ या ऽ
* – ० – * – ० – * – ० – * – ० – * – ० – * –
रेनी सा
ज य ॥ ध्रु० ॥
० –
म प नी सां सां सां सां सां प नी सां रें नि ध प – प नी सां–
वी ऽ रा ऽ जि ऽ की ऽ प्री ऽ ति सु यो ऽ गे ऽ प्र ब ला ऽ
* – ० – * – ० – * – ० – * – ० – * – ० –
नि – सां रें नी ध प -- (गपधसांनी) ध ग म् ग–
को ऽ म ल का ऽ या ऽ से ऽ ऽ वि पा ऽ या ऽ ... ... मिळ-
* – ० – * – ० – * – ० – * – ० –
०वाया जय ॥ १ ॥

घेऊन धीळधरही आज कसा निघून गेला! तो जवळ नसल्यामुळें सर्व सैन्यांत आज माझें हंसें झालें असेल! लष्करच्या सलामीचा समारंभ पाहण्याकरितां मीं वनमालेला मजबरोबर नेली, हीच पहिली मोठी चूक झाली. वीर पुरुषांनीं मला नम्रपणें मुजरा करावा, आणि धैर्यधरा, गौरवाचा एक शब्द उच्चारण्याचें किंवा शाबास म्हणण्याऐवजीं सस्मित पाहण्याचेंही भान तुला राहूं नये? सैनिक काय म्हणत असतील! तीन चांदांच्या सरदारीनें आणि पंचवीस लाखांच्या जहागिरीनें सेनापती ताठून गेले, असें दूषण सर्व लोक देत असतील. पण मी तरी काय करूं? निरनिराळ्या पथकांची सलामी चालली असतांना वनमाला मध्येंच चोरून मजकडे पाही, किंवा गालांतल्या गालांत हंसत एखादा प्रश्न विचारी; आणि मग माझ्या पुढून चाललेल्या सर्व वीरांनीं वनमालेचींच सोंगें घेतलीं आहेत कीं काय असा मला भास होई. वीर पुरुषहो, मी तुमचा शतशः अपराधी आहें, सहस्रशः अपराधी आहें; मला वेड लावणाऱ्या त्या तरुणीचें सोंग माझ्या नादी मनानें तुम्हांला दिलेलें पाहण्यापेक्षां, तुमच्याकडे दुर्लक्ष करून, वनमालेचें तें लाजरें मुखकमल निर्लज्जपणानें पाहणें किंवा तिच्या अस्पष्ट व अर्धवट प्रश्नाला मोकळ्या कंठानें लांबलचक उत्तर देत बसणें, हें तुमच्या व माझ्या लष्करी बाण्याला अधिक श्रेयस्कर आहे, असें मला वाटलें! वनमाला जरा दूर झाली आणि मी माझ्याशींच विचार करूं लागलों,–तिच्याशीं इतकें बोलायचें मला सुचलें तरी कसें? तिच्या गालावरील लाजेच्या लाटांच्या प्रत्येक हेलकाव्याबरोबर माझी जीभ आपोआप कां नाचत होती? तिच्या लाजण्याला आणि माझ्या बोलण्याला अशी एकदम भरती कां यावी बरें? हां, बरोबर आहे.

[ पद ४०.—" हूं तो करोंगी " या चालीवर. ]

**भालीं चंद्र असे धरिला, नाचे स्मरसागरवेला ॥ ध्रु० ॥**
**बोला चतुरा बोलवी चंद्रकला कैसें मदनबलें मंजु-**
**मंजुला। वनमाला बाला दावी लज्जा गाला स्मरलीला ॥ १ ॥**

---

४० जिल्हा–जंगला, दीपचंदी.

नि॒ सा – रे ग म॒ म म॒ रे – मं ग॒सा रे ध नि॒ — सा ग॒
भा ऽ ऽ ऽ लीं ऽ ऽ ऽ चं ऽ ऽ ऽ ऽ द्र अ से ऽ ऽ ऽ ऽ ध रि
० – * – ० –

[ पुढें चालू

मस्तकावरील या चंद्राच्या सांनिध्यामुळे माझी ही तारांबळ उडाली ! त्यालाच बरा दूर करावा, म्हणजे चित्त आपोआप स्थिर होईल. ( पगडी हातांत घेऊन ) बा चंद्रा, तुझा मीं इतका सन्मान करून तुला शिरावर वाहिलें त्याचे उपकार तूं असे फेडलेस काय ? एखाद्याची फाजील बडेजावी करून श्रेष्ठ पदाला चढविलें म्हणजे अखेरीस तो डोक्यावर मिरे वाटल्यावांचून राहत नाहीं, याचा अनुभव, आज चंद्रा, तूं मला चांगला आणून दिलास ! पहा, डोक्यावरून खालीं ओढण्याबरोबर आतां कसा बलहीन झाला आहे तो ! माझें सर्व लष्करी तेज आतां पुन्हा जागें झालें आहे. अगदीं टक लावून मजकडे पहा, आणि तुझ्या-

र ——— सा —— रे ग म् प ध नि् ध प मंग —— म् प
ला ऽ ऽ ऽ ऽ ऽ ना ऽ ऽ ऽ चे ऽ ऽ ऽ ऽ ऽ स्म र सा ऽ ऽ ऽ ग र
* — ० — * — ०

रे ग् —— रे ——— गं्
वे ऽ ऽ ऽ ला ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ॥ ध्रु० ॥
* —

सा —— (रेगमगम्) रे मंग् सा रे —— ध नि् —— सा रे मंग्——
बो ऽ ऽ ऽ ला ऽ ऽ ऽ च तु रा ऽ ऽ ऽ बो ऽ ऽ ऽ ऽ ऽ ल वि चं ऽ ऽ
० — * — ० — *

सा रे सा – ग – म् —— रे – ग् सा – रे सा ——— ध नि्
द्र क ला ऽ कैं ऽ ऽ सें ऽ ऽ ऽ म ऽ द न ऽ ब ले ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
— ० — * — ० —

सा – रे (सारेमंग्) रे सा ——— ग म् प —— प – पधनी
मं ऽ जु मं ऽ जु ला ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ व न मा ऽ ऽ ऽ ला ऽ ऽ बा ऽ ऽ
* — ० — * — ०

ध – प – ग म् – ग —— म् – म् ध प नी ध ग म् ——
ला ऽ ऽ ऽ दा ऽ ऽ वी ऽ ऽ ऽ ल ऽ ज्ञा ऽ ऽ ऽ ऽ गा ऽ ऽ ऽ
— * — ० — * —

ग —— म् प (ग म् प –) रे ग् – रे – गं्
ला ऽ ऽ ऽ स्म र ली ऽ ऽ ऽ ला ऽ ऽ ऽ ऽ ऽ ॥ १ ॥
० — * —

मुळें मदनबाधा मला कशी पछाडते तें पाहूं दे. आतां मी शुद्धीवर आलों. बस्स, मला ही चौकशी केलीच पाहिजे, शीलधर आणि इतर नोकर मला न विचारतां रजेवर गेले कसे? त्यांना रजा देणारी ही वनमाला कोण? हा चांद डोक्या-वरून खालीं उतरून ठेवला आहे; आतां येऊं दे तर खरी, अशी खरड काढतों, एवढ्या मोठ्या सेनेचा सेनापती म्हणजे तिला खेळणें वाटलें नव्हे का?–पण ती अजून कां येत नाहीं?–शीलधर आणि सगळे निघून कसे गेले? त्यांना रजा कोणीं दिली? मी एकटा या ठिकाणीं कसा बसून राहूं? माझा पोषाख कोण उतरणार? कोणी नाहीं का तिकडे? सगळीं माणसें बाहिरीं झालीं कीं काय? कोणी नोकरचाकर येथें नाहीं म्हणजे काय? ( पडद्यांत–"मी आलें महाराज. माझ्या हातांतला पंखा मीं आतां कोठेसा ठेवला, तेवढा पाहून घेऊन येतें." ) बरें, बरें, लवकर ये.–हा काय चमत्कार! "लवकर ये" हे शब्दसुद्धां रागानें ठांसून मला उच्चारतां येऊ नयेत अं! ( पडद्यांत– "ही मी आलेंच लवकर महाराज." ) तितकी कांहीं घाई नाहीं; सावकाश–लवकर–अरे, माझा सगळा राग कसा एकदम नाहींसा झाला! वनमाले, तुझ्या एकदांच गोड शब्दांनींच मला शांत केलें, वारा घालून शांत करण्याची आतां काय जरूरी आहे? पूर्वीचे रथी, महारथी ज्याप्रमाणें धनुष्याच्या दोरीच्या आवाजानें शत्रूंना पळा-वयास लावीत असत, धनुष्यावर बाण चढवायची त्यांना जरुरीच राहत नसे, त्याप्रमाणें वनमाले, तूं या वेळीं पराक्रम गाजविलास. माझा क्रोध, माझा आवेश, माझा लष्करी बाणा, तुझ्या शृंगाराच्या या शत्रूंचा तूं एका शब्दानें दाणादाण उडवलीस! सर्व रस प्रेमाच्या प्रभावळींतले मणी असून एकट्या प्रेमाचें तेज खुलविण्याकरितां ते प्रेमाच्या सभोंवतीं घुटमळत असतात, हेंच खरें; नाहीं तर प्रेमाचा नुसता ध्वनि ऐकण्याबरोबर दीन दासाप्रमाणें माझा क्रोध असा दडून कां बसला असता? प्रेमाचें सुख स्वकीयांना अव्याहत मिळावें, म्हणूनच ना ही लढाई-ची खटपट? प्रेमाची ताटातट होते, म्हणूनच ना करुण रसाचे हुंदके मनुष्याला येतात? सर्व विचारांच्या, सर्व विकारांच्या, सर्व उद्योगांच्या, सर्व हालचालींच्या बुडाशीं प्रेम असतें, किंबहुना प्रेम नाहीं तर जगांत कांहींच नाहीं. मग अशा प्रेमाला बळी पडून सेनापती धैर्यधर यांनीं, सर्व सैन्यासमक्ष थोड्याशा शृंगार-चेष्टा केल्या तर सैनिकांनीं तरी त्याला काय म्हणून हसावें? आणि मी म्हणतों

सैनिक गमतीनें हंसले तर त्याबद्दल मला विषाद तरी कां वाटावा ? खरें म्हटलें असतां वाईट न वाटतां उलट मला आनंदच झाला पाहिजे; आणि झालाच आहे मला तसा आनंद ! या सुखाची सत्ता उघडपणें कबूल न करण्यांत कांहीं पुरुषार्थ नाहीं. आतां वनमाला आली म्हणजे तिला स्वच्छ सांगणार, तूं सर्वांना रजा दिलीस यामुळें मी अगदीं खूष झालों आहें.

[ पद ४१–" हूं तो जप्ये " या चालीवर. ]

**प्रेमभावें जीव जगिं या नटला । एकचि रस त्याला ॥ ध्रु० ॥ नसती भिन्न रस हे, शृंगार राजा नवल त्याला ॥ १ ॥ सकला किरण रंगा दावी इंद्रधनुषीं जन-नयनाला ॥ २ ॥**

ही पहा वनमाला आलीच ! क्रोध म्हणजे कोणच्या गांवचा पदार्थ असतो, याचीही मला आतां आठवण राहिली नाहीं. [ भामिनी येते..

४१ राग भिमपलासी, त्रिवट.

प – सां ध् – प – म्प ध् म् प ग् ग् ग् – सा रे सा – रे –
प्रे ऽ म भा ऽ वें ऽ जी ऽ ऽ व ज गिं या ऽ न ट ला ऽ ए ऽ
* – ० – *

सा सा रे म् प – (ध्ध्पम्पम्रेम्)
क चि र स त्या ऽ ला ऽ ऽ ऽ ऽ ॥ ध्रु० ॥
– ० –

म् प ध् – ध्नि् सां सां सां सां ——— ध् – सां –रे'सां ग्
न स ती ऽ भि ऽ न्न र स हे ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ शृं ऽ गा ऽ ऽ ऽ ऽ
* – ० – * –

रे'सां (नि्सांरे'सां) ध् – प – प ध् प म् (म्पध्सांरे'ग्रे')
र रा ऽ ऽ ऽ जा ऽ'ऽ ऽ न व द ल त्या ऽ ऽ ऽ ऽ
० – * – ०

(सांनि्ध्पम्ग्रेसा)
ला ऽ ऽ ऽ ॥ १ ॥
–

( " सकला किरणरंगा " वगैरे पहिल्या अंतऱ्याप्रमाणें )



धैर्य०—मी उतावीळपणानें भलतेंच बोलून गेलों वाटतें ! [पृ. ९१

**भामि०**—म्हटलें, माझ्या हातून चूक झाली. हा पंखा कांहीं केल्या लवकर सांपडेनाच. आतां यापुढें मी प्रत्येक पदार्थ नीट जागच्या जागीं ठेवीत जाईन. आम्हां गरिबांच्या घरीं जिन्नसपान्नस कांहीं नसायचें, कोणचाही जिन्नस कोठेंही ठेवला तरी चुकल्यासारखें होत नाहीं. येथल्या श्रीमंतीमुळें मी अगदीं भांबावून गेलें आहें! त्यामुळें सेवेंत अंतर पडतें. रागबिग नाहींना आला?

**धैर्य०**—( स्वगत ) मी रागावलों आहें, असें समजून ही फारच गोड गोड बोलूं लागली आहे. उसना राग आणून कांहीं वेळ गप्प बसण्यांत अधिक सुख आहे. [ तोंड फिरवून बसतो.

**भामि०**—( वारा घालीत ) म्हटलें, रागबिग नाहींना आला? मला जशी आज्ञा होईल तशी सेवाचाकरी करीन. प्रवासांतील या सहवासानें श्रीमंतांच्या घरीं नोकर होऊन कसें रहावें, इतकें जरी मी शिकलें, तरी बाबांना पुष्कळ बरें वाटेल; आणि माझें पुढें काय होईल म्हणून त्यांना वाटत असलेली काळजी दूर होईल. खरेंच महाराज, अगदीं कसून कसून माझ्याकडून चाकरी घ्यायची; सेवाधर्म शिकविण्याचे मजवर उपकार करायचेच होते.

**धैर्य०**—वनमाले, मला नाहीं वाटत सेवाचाकरी करायला तूं जन्माला आली आहेससें. तूं अशी वारा घालूं लागलीस म्हणजे असें होऊन जातें—

**भामि०**—कुठें चुकत असलें तर मला समजावून सांगायचें होतें.

**धैर्य०**—अग, मोठीच चूक होते आहे.

**भामि०**—ती कोणची?

**धैर्य०**—तूं येथें बसायला पाहिजे होतीस आणि मी तसा उभा राहून वारा घालायला पाहिजे होतें! बसतेस येथें? मी दाखवूं वारा घालून? कां? दूर कां? रागावलीस कीं काय? ( स्वगत मी उतावीळपणानें भलतेंच बोलून गेलों वाटतें!

**भामि०**—बाबा म्हणत असतात, बडे बडे श्रीमंत अगदीं लहरी असतात, आणि त्यांच्या लहरीची तब्येत संभाळणें फारच कठीण! आपण तीन चांदांचे सरदार, पंचवीस लाखांचे जहागिरदार; नुसती शब्दानें आज्ञा करावी, मी तसा वारा घालीन. स्वतः श्रम कांहीं श्रीमंतांनीं नकोत घ्यायला! श्रीमंत

जर स्वतः राबू लागले तर मजसारख्या गोरगरिबांनीं नोकरचाकराच्या पेशांत कसे तरबेज व्हावें ?

धैर्य०—तुला तरबेज होऊन काय करायचें आहे ?

भामि०—कोणातरी श्रीमंताच्या राणीपाशी नोकरीला रहायचें आहे. आम्ही विलासधरजींच्या आश्रितांपैकी आहोंत, हे महाराजांना माहीतच आहे; आणि माझ्या बाबांच्या मनातून विलासधरजींची मेहुणी भामिनी—गरिबांची जन्मकथा श्रीमंताना कंटाळवाणी होत असते, हे मी विसरले. माझी एवढी चूक पदरात घ्यावी; पुन्हा मी माझी हकीकत सांगून महाराजांना त्रास देणार नाहीं.

धैर्य०—तसे नव्हे ग; त्या भामिनीचे नाव ऐकले की कपाळाला आठ्या चढतात ! ते कडू नाव वनमालेच्या मधुर ओठानींच उच्चारले म्हणून कपाळ तितकें दुखूं लागले नाही.—बाकी ते नाव तुझ्या मुखकमलांत कितीही घोळले, तुझ्या अधरामृतात कितीही लोळले, तरी कडू तें कडूच ! बरें, सांग पुढें तुझी हकीकत. गप्प का ? सांगना पुढे ?—बरें बुवा, वनमालेने आमच्याशीं असा अबोला धरू नये म्हणून भामिनीचे कडू नाव स्वतः पाहिजे तितक्यादा उच्चारण्यास आम्ही तयार आहो. मग तर झाले ? सांग पुढे हकीकत.—किती वेळा ' भामिनी ' भामिनी ' म्हणूं, सांगना ? भामिनी—भामिनी—भामिनी—

भामि०—त्या भामिनीच्या तैनातीला मला ठेवण्याचा बाबांचा संकल्प आहे श्रीमंताच्या घरीं रहावें कसें, हे शिकण्याची संधि या प्रवासांत मला मिळाली, हे मजवर आपले मोठे उपकार आहेत.

धैर्य०—तू माझी सेवाचाकरी आपण होऊन करूं लागलीस, हेच मजवर मोठे उपकार आहेत. हे पहा, त्या भामिनीच्या तैनातीला राहण्याचें तुला काहींच कारण नाही. तुझ्या वडिलांची गाठ पडली म्हणजे मीच त्यांच्यापाशी तुझ्यासंबधाने—

भामि०—मला काय, बाबांनी सांगितलें तर आपल्या भावी राणीपाशी मी नोकरीला राहीन. भामिनीपाशींच राहण्याचा माझा बिलकूल हट्ट नाहीं. शिवाय मीं ऐकलें आहे, ती भामिनी म्हणे फारच मिजासखोर आहे.

**धैर्य०**—श्रीमंतीच्या गर्वानें धुंद झालेली ! तुझें आणि तिचें क्षणभर नाही पटायचें.

**भामि०**—पाहिजे त्याला पाहिजे तसे टाकून बोलते—

**धैर्य०**—अगदीं खरें आहे. गरिबांना तर ती कस्पटाप्रमाणे समजते. तिच्या वाऱ्यालासुद्धा उभी रहायचे मनांत आणूं नकोस.

**भामि०**—आणि ओठावरचे जांभूळ जिभेवर लोटण्याइतकी तिची सेव चाकरी करावी लागते

**धैर्य०**—हे ऐदी श्रीमंत गरिबांची अशी हाडे खुसळण्याकारता जन्मास आलेले असतात. तूं जर त्या भामिनीच्या तैनातीला राहिलीस तर एक दोन दिवसातच मेटाकुटीला येशील; आणि असा हा सुकुमार देह मृत्युमुखी टाकण्याचे पातक तुझ्या वडिलांना लागल्याशिवाय रहायचे नाही.

**भामि०**—खरेच महाराज असें होईल खरें. नाही ग बाई, मी त्या भामिनीच्या तैनातीला रहायचीच नाही. पिढीजाद श्रीमंताची ती पोर, माझा जीव मला नकोसा करून टाकील.—श्रीमंतांच्या घरची नोकरी म्हणजे प्राणाशीच गाठ.—श्रीमंतीत मला वाटते देवानें असला काही तरी दोष कायमचाच ठेवलेला दिसतो. श्रीमंती येऊन दोन दिवस का झालेले असतात, नोकरचाकर जरा जवळ नसले की लागलीच तब्बेत जाते; एखाद्या मोठ्या लढाईचे कारस्थान फिसकटल्याप्रमाणे नोकरचाकरांवर गुरगुरायचे होतें; आणि डाव्या बाजूला कललेली पगडी उजव्या बाजूला सरकवायचा असली तरी एखाद्या वनमालेला धांवून यावे लागते !—महाराज, आपण म्हणतां तेंच खरें, मी जर भामिनीच्या तैनातीला राहिले तर वनमालेचा अवतार दोन दिवसांतच संपेल. देवाचे हे माझ्यावर उपकारच आहेत—

**धैर्य०**—कोणचे उपकार ? आमचा आणखी कानउघाडणी कोणची करायची आहे ? डोळ्यांना चुरचुरूं न देता पुरुषाच्या डोळ्यांत झणझणीत अंजन घालण्याची युक्ति बायकांनाच साधते. देवाचे कोणचे उपकार आपल्यावर झाले ? सांगा, लाजायला नको. वाचा, माझ्यांत कोणचे दोष तुम्हांला दिसतात त्यांचा पाढा अखेरपर्यंत वाचा.

**भामि०**—आपल्यांत जर मला दोष दिसले असते तर मीं आपखुषीनें आपली सेवाचाकरी कशाला केली असती ? आपल्यांत दोष दिसत नाहींत, श्रीमंतींत दिसतात मात्र; मग ती श्रीमंती भामिनीच्या हातांत पिढीजाद खेळणारी असो, किंवा सेनापतीसाहेबांच्या पायावर काल लोळण घेणारी असो. म्हणून म्हणतें देवाचे मजवर मोठे उपकार आहेत. माझ्या बाबांच्या मनांत ज्याप्रमाणें कोणाही श्रीमंताला मला देऊन टाकण्याचें येत नाहीं, त्याचप्रमाणें माझ्याही मनाला श्रीमंताशीं लग्न करावें असें स्वप्नांत देखील वाटत नाहीं.

**धैर्य०**—अग, पृथ्वीधर महाराजांचा सेनापती तीन चांदांचा सरदार, पंचवीस लाखांचा जहागीरदार, आणि श्रीमंत आहे. पण मी धैर्यधर कांहीं सरदारही नाहीं, जहागीरदारही नाहीं, आणि श्रीमंतही नाहीं. त्या सेनापतीला तूं खुशाल झिडकारून बोल; पण मी धैर्यधर तुझ्याहूनही गरीब आहें, हें विसरूं नकोस.

**भामि०**—हे बारीकसारीक भेद समजण्याइतकी बुद्धि आम्हां बायकांना कुठली असायला ! माझ्या डोळ्यांना धैर्यधरजीच सरदार दिसतात, जहागीरदार दिसतात, श्रीमंत दिसतात;—

**धैर्य०**—तसें बिलकुल नाहीं; मी गरीबच आहें, आणि असेंच आजन्म गरीब रहावें, अशी माझी इच्छा आहे. पंचवीस लाखांची जहागीर मला मिळाली, आणि हा सरदारीचा पोषाख मीं अंगावर घातला, एवढ्यावरून श्रीमंतीच्या चोंचल्यांच्या भोंवऱ्यांत मी सांपडलों आहें, असें तूं समजूं नकोस. श्रीमंतीचा मीं स्वीकार केला आहे तो या श्रीमंतीला कार्याला जुंपावी आणि बदफैली विलासांत लोळत पडूं न देतां एखाद्या चांगल्या कामीं सतत खपण्याची तिला संवय लावावी म्हणून.

**भामि०**—प्रत्येक श्रीमंत मनुष्य श्रीमंतीच्या पहिल्या भेटीच्या वेळीं असेंच म्हणत असतो, पण थोडीशी जानपच्छान झाली, सलगी जरा वाढत गेली, आणि श्रीमंतीचा अहोरात्र सहवास घडून कांहीं काळ लोटला, म्हणजे कार्यबिर्य एका बाजूला तेव्हांच सरतें, व श्रीमंतीच्या आहारीं मनुष्य पडतो ! महाराज, श्रीमंतीला कामाला लावण्याची आपली हांव फुकाची आहे.

[ पद ४२—" कालि बदरीया " या चालीवर. ]

**श्री नव नवरी भासे ॥ श्री ॥ ध्रु० ॥ स्वपति बुडविला शयनीं सागरीं । कामा कशि ये पतिता नारी ॥ १ ॥ फिरवित सकला चपला भिंगरी । कोणा कधीं तरि नच वरी नवरी ॥ २ ॥**

**धैर्य०**—तूं म्हणतेस तें कांहीं खोटें नाहीं. पण जागृत झालेल्या गरिबांनीं श्रीमंतीचा स्वीकार जर केला नाहीं तर बदफैली श्रीमंतांचीं दुर्व्यसनें अजरामर केल्यासारखें नाहीं का होणार ? श्रीमंतीचा ताठा सुजनांनीं स्वतः श्रीमंत होऊनच उतरावयाचा असतो; दुर्जनांच्या श्रीमंतीच्या रोगावर सुजनांच्या श्रीमंतीशिवाय दुसरीतिसरी कोणचीच मात्रा लागू पडत नाहीं. श्रीमंतीचा काटा श्रीमंतीनेंच काढावा लागतो. श्रीमंतीच्या बलाचीं सूत्रें दुर्जनाशिवाय इतरांच्या हातांत गेल्याशिवाय कोणचेंही मोठें कार्य तडीस जात नाहीं, आणि एवढ्याचकरितां मीं या जहागिरीचा स्वीकार केला आहे.

— —

४२ जिल्हा, कवाली.

सा रे ग (पंम्) रे ग सा – सा – निंसां रे ---
श्री ऽ न व न व रीं ऽ भा ऽ ऽ ऽ से ऽ ऽ ऽ ॥ ध्रु० ॥
* – ० – * – ० –

सा रे सा ग ग ग ग – म् म् म् (धंप) ग म् रे ग म् ध ध – ध
स्व प ति बु ड वि ला ऽ श य नीं ऽ सा ऽ ग रिं का ऽ मा ऽ क
* – ० – * – ० – * – ०

प (धंनींसां) प ध म् प ग म् (गरेसा)
शि यें ऽ प ति ता ऽ ना ऽ रीं ऽ भासे ॥ १ ॥
– * – ० – *

( दुसरा अंत्रा पहिल्या अंत्र्याप्रमाणें )

[ पद ४३—" क्षणमधुना नारायण " या.चालीवर. ]

**मनुज धरी आम्रापरि सुवासित विभवमया मंजिरी ॥ ॥ ध्रु० ॥ कुसुमित विटप दिसे मग होइ तो विपुलसुफल-मनहारी ॥ १ ॥ नररणसाहस वैभव पावत मग जनदुरित निवारी ॥ २ ॥**

तुला जसा श्रीमंतीचा द्व्यास नाहीं, तसा मलाही नाहीं. श्रीमंती मिळाल्यामुळें इतरांप्रमाणें मीही कदाचित बिघडून जाईन, अशी तुला जशी शंका येते, तशी मलाही भीति वाटते; आणि म्हणूनच माझी इच्छा आहे कीं, कार्यवश होऊन मीं श्रीमंती अशी धारण केली असतां तिच्या संपर्कानें मी मदोन्मत्त होऊं नये म्हणून माझ्या अंगावरून ती उतरण्याचें काम आजच्याप्रमाणें सदोदित तुज-

४३ जिल्हा मांड, त्रिवट.

मगे सां नी ध प प (नींधंप) म् — ग रे सा (सांरेग) सा सा सा
म नु ज ध री ऽ आ ऽ म्रा ऽ प रि सु वा सि त वि

रे म् म् प — प ध म् प (धसांरे गंम्गं रे सांनीधपम्गरेसा)
भ व म या ऽ मं ऽ जि री ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ॥ ध्रु० ॥

ग ग प ध सां सां सां सां सां रें रें सां (सांरें गं) रें सां-ध रें सां
कु सु मि त वि ट प दि से ऽ म ग हो ऽ इ तोऽवि पु ल

नी ध ध प प प(ध प धनीं) ध प — म् ध प ध म् (गरें) सा
सु फ ल म न हा ऽ ऽ ऽ री ऽ ऽ न र र ण सा ऽ ह

सा (सांरेंग्) म् म् (मंपध) प प प ध सां सां सां सां सां सां प ध
स वै ऽ भ व पा ऽ व त नि ज ज न दु रि त नि वा ऽ

(सांरें गंम्गं रें सांनीधपम्गरेसा)
री ऽ ऽ ऽ ऽ ऽ ॥ १ ॥

कडे असावें. मघाशीं तूं लवकर आली नाहींस म्हणून मी जरा रागावलों, याचें कारण झालें तरी हेंच. ही पगडी व हा पोषाख तुझ्या हातांनीं माझ्या अंगावरून उतरल्याशिवाय माझें मन पाक राहील असा विश्वासच मला वाटत नाहीं. हं, उतरा हा पोषाख, आणि श्रीमंतीच्या बंधनांतून करा आम्हांला मुक्त ! ( भामिनी पगडीशिवाय इतर पोषाख काढून साफसूफ करून ठेवूं लागते. ) पुरुषांनीं मिळविलेल्या वैभवाचा भार बायकांनीं असा हलका केला म्हणजे पुरुषांना कृतकृत्य वाटतें. वनमाले, तूं म्हणतेस तें कांहीं खोटें नाहीं; श्रीमंतींत मूळचेच थोडेबहुत दोष आहेत; आणि म्हणून मी म्हणतों, पुरुषांनीं श्रीमंती मिळवावी, पण लगेच ती बायकांच्या हवालीं करून आपण मोकळें व्हावें. कारण पतितांना पावन करून घेण्याचा स्वतःचा अधिकार परमेश्वरानें पुरुषांच्यापेक्षां बायकांकडे अधिक ठेवला आहे. वनमाले, या श्रीमंतीमुळें मी जर पतित झालों असलों, तर मला पावन करून घेण्यास तूं समर्थ नाहींस काय ?

**भामि०**—राग नाहीं यायचा तर विचारतें हो; आपणाला भामिनीला असेंच पावन करून घेतां नसतें का आलें ?

**धैर्य०**—नसतें असें नाहीं. पण मला पावन करून घेणाऱ्या वनदेवतेची आणि माझी गांठ पूर्वींच पडली होतीना ? वनमाले, मी लष्करी गडी, लष्करी कायद्यांचा धोपट मार्ग मला माहीत. लष्करचा असा कायदा आहे, वरिष्ठ अधिकारी जाग्यावर हजर असला म्हणजे खालच्या अधिकाऱ्यानें स्वतःच्या अकृत्यारींत कांहींही करतां कामा नये; पतितपावनाचा अधिकार चालविणाऱ्या या देवतेनेंच, श्रीमंतींत कसें वागावें याचा कित्ता सर्व बायकांना घालून देऊन, भामिनीसारख्यांना शुद्धीवर आणलें पाहिजे.—का, सगळा पोषाख उतरून झाला का ? हा आमच्या मस्तकावरील चंद्र तेवढा उतरून घ्या. मघाशीं मीं माझ्या हातांनींच त्याला खालीं उतरला होता, पण—

**भामि०**—मग त्याला खालीं उतरायला मीच कशाला पाहिजे ?

**धैर्य०**—माझें असें आहे, मी आपल्यावरून जग ओळखतों. तुझ्या कोमल हातांचा स्पर्श होण्याच्या वेळेला मींच जर माझे हात त्याला लावले तर त्याला

राग नाहीं का येणार ?—हा पक्षपात काय म्हणून ? मुखचंद्राचा प्रतिस्पर्धी म्हणून तुझ्या करांनीं त्याच्यावर हल्ला करायला पाहिजे होता; मग उशीर कां ?

**भामि०**—पण मला तो चंद्र दिसेल तर ना त्याला मी खालीं उतरून ठेवणार ? मी किती वेळ टक लावून पाहतें आहें; पण कांहीं केल्या तो मला दिसतच नाहीं.

[ पद ४४—" अब तो जिवन " या चालीवर. ]

**दिसत न नयना या भूषणमय चंद्रकिरण ॥ ध्रु० ॥ सकल वदत याचि भजा चंद्रशेखरातें । वरिरवीजवाळि कसा दिसत इंदु त्यातें । होइ चकित हें मम मन ॥ १ ॥**

---

४४ ( राग-खमाज, दादरा. )

प घ प ध म् ग सां रेंग– (रेंग) प – (गम्पधसा) नि् नि् ध प
दि स त न न य ना ऽऽ या ऽ ऽ भू ऽ ष ण म य
* ‒ ० * ‒ ० * ‒ ०

(मंपध–) ध म् ग (रेंसा)
चं ऽ द्र कि र ण ॥ ध्रु० ॥
* ‒ ०

ग प प प (धंनी) नी नी – सां सां सां – नीं – नीं सां – सां
स क ल व द त या ऽ चि भ जा ऽ चं ऽ द्र शे ऽ ख
* ‒ ० * ‒ ० * ‒ ०

नी सांरें — (नींधप) नीं – नीं नीं नी — प नीं सां रें नी सां
रा ऽ ऽऽ ते ऽ वी ऽ र र वी ऽ ज व ळि क सा ऽ
* ‒ ० * ‒ ० * ‒ ०

ध (सांनि्) ध (पंमंग–) सा ग म् (गम्पधसा—) नि् – नि् ध प
दि स त इं ऽ दु त्या ऽ ते ऽऽऽ हो ऽ इ च कि
* ‒ ० * ‒ ० * ‒ ०

प (मंपध–) म् ग रेंसा सा
त हे ऽ म म म न ॥ १ ॥
* ‒ ०

धैर्य०—

[ पद ४५—" माईपीतमबीन " या चालीवर. ]

**रवि मी, हा चंद्र कसा मग मिरवितसे लावीत पिसें ॥ ॥ ध्रु० ॥ त्या जें न साधे गगनीं, गमे तें साधेंचि तव या वदनीं । अबलाबल नव हें भासें ॥ १ ॥**

४५ तिलककामोद, दीपचंदी.

सा रे प – (रेम्पधनि्) प ध – (म्गं) सा
र वि मी ऽ हा ऽ ऽ चं ऽ ऽ द्र क
* – ०
सा (रेगपंम्) गंरे ग —— रें सा – नी — प प नी सा
सा ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ म ऽ ग ऽ ऽ मि र वि त
– * – ० – *
सा (गरेम्गंरें) सा(रेम्पसां)पनी–(धंपं) म्पध ——म् ग सा —
से ऽ ऽ ऽ ऽ ऽला ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ वी ऽ ऽ ऽ ऽ त पि सें ऽ ऽ
– ० – * – ० –
रविमी ... ... ॥ ध्रु० ॥
*
म् – प नी — नी सां — सां — नी सां गंरें मं गं
त्या ऽ ऽ जे ऽ ऽ न सा ऽ ऽ धे ऽ ऽ ऽ ग ग नीं ऽ ग
* – ० – * –
सां (रें गं) – सां —- मां — नी – ध प ग् ग —
मे ऽ ऽ ऽ ऽ तें ऽ ऽ ऽ सा ऽ ऽ धें ऽ ऽ चि त व ऽ
० – * – ०
(सारेगपम्ग) नी सा नीं — प प सा — सा – सा – सा रे –
या ऽ ऽ ऽ व द नीं ऽ ऽ अ ब ला ऽ ऽ ब ऽ ल ऽ न व ऽ
– * – ० – *
(सारेम्पध)म् – रेंग सा —
हे ऽ ऽ ऽ भा ऽ ऽ सें ऽ रविमी ...... ॥ १ ॥
– ० – *

तुझ्या मुखाशिवाय इतर ठिकाणीं या पृथ्वीतलावर चंद्र राहूं शकतो, यामुळें तुला याचा हेवा वाटतो; होयना ? होय. अस्सेंच. तुझ्याच हातांनीं ही पगडी आमच्या मस्तकावरून निघाली पाहिजे. हो, अस्सेंच, मी असा हट्ट धरून बसणार.

**भामि०**—( स्वगत ) त्या चंद्रानें किती तरी चेहऱ्याला मोहकपणा आला आहे. मी कधीं नाहीं माझ्या हातानें तो दूर करायची.

**धैर्य०**—काय, आमचा एवढाही हट्ट नाहीं चालवायचा ?

**भामि०**—( स्वगत ) आतां असें करावें ? ( उघड ) महाराज—

[ **पद ४६**—" हट छोड सखे " या चालीवर. ]

**शशिसूर्यप्रभा गगनाची, ही दासी भूमितलावरिची ॥ध्रु०॥**
**मुखभानुवरा भालहिमकरा स्पर्शाया न धजे काया ॥ १ ॥**
**हे चरण मला रविचंद्रकला, सेवायोग्य गमे यांची ॥ २ ॥**

( धैर्यधराचा चढाव घेऊन पुशींत उभी रहाते. )

४६ ( पहाडी-मांड, धुमाळी. )

सां सां सां – सां सां सां – नी सां नी ध प – (मंपंध–) म ध
श शि सू ऽ र्य प्र भा ऽ ग ग ना ऽची ऽ ही ऽ दा ऽ
* – ० – * – ० – *

प – रेंग – रे सा( सांरेंगंप) रे ग रेंसा –––
सी ऽ भू ऽ मि त ला ऽ व रि ची ऽ ऽ ऽ ॥ ध्रु० ॥
– ० – * – ० –

सां सां सां – सां सां सां – नी सां नी ध प म (मंपध–) म ध
मु ख भा ऽ नु व रा ऽ भा ऽ ल हि म क रा ऽ स्प ऽ
* – ० – * – ० – *

प – ( रेंग– रें ) सा सा (सांरेंगंप) रे ग रेंसा
र्शा ऽ या ऽ न ध जे ऽ का ऽ या ऽ ऽ ऽ ॥ १ ॥
– ० – * – ० –

( 'हे चरण मला' ... वगैरे "मुखभानुवरा" ...प्रमाणें. )

**धैर्य०**—हें काय वनमाले ! अग, धर्मसत्तेनें माझ्या अर्धाङ्गाचा ताबा तुझ्याकडे लवकरच यावयाचा आहे, प्रेमसत्तेनें माझ्या सर्व शरिरावर अधिकार मिरवायला पूर्वीच तूं लागलेली, आणि मग अशी सेवा कां ? नको, वनमाले नको, अशी माझी सेवा करूं नकोस. माझी इतकी योग्यताच नाहीं.

[ पद ४७—राग भीमपलास, ताल झंपा. ]

**प्रेम सेवाशरण सहज जिंकी मला। मीच चुरिन चरण, दास मी हों तुला ॥ ध्रु० ॥ मन तोडि रणबंध, लागे तुझा छंद। कीर्ति हा मज चांद, तव पदीं वाहिला ॥ १ ॥**

[ पगडी काढून तिच्या चरणावर ठेवतो.

४७ ( राग–भीमपलास, झंपा. )

प – प मंग – सागम् ग् रे सा प नि् नि् सा – नि्साग् रे सा –
प्रे ऽ म से ऽ वा ऽ श र ण स ह ज जिं ऽ की ऽ म ला
* – ० – * – ० –

प – प नि् ध प प म् ग् रेंसा नि् – सा सा ग् ग् म् प
मी ऽ च चु रि न च र ण ऽ दा ऽ स मी ऽ हों ऽ तु
* – ० – * – ० –

(मंग्) संरेसा (साग्म्पधम्प) प – प
ला ऽ प्रे ऽ म... ॥ ध्रु० ॥
* –

म् प ग् – म् प नि् नि् – सां प – नि् सां गं रें सां– नि् ध प
म न तो ऽ डि र ण बं ऽ ध ला ऽ गे ऽ तु झा ऽ छं ऽ द
* – ० – * – ० –

प – प मंग् – मं प नि् नि् सां सां मं गं रें सां – नि् ध प
की ऽ र्ति हा ऽ म ज चां ऽ द त व प दीं ऽ वा ऽ हि
* – ० – * – ० –

(ग्म्पधम्प)
ला ऽ ॥ १ ॥

[ **पडद्यांत**—" वनमाले, अग वनमाले, वसंतोत्सवाचें आमंत्रण करण्याकरितां हे या गांवचे लोक महाराजांचे दर्शनाला आले आहेत; तर त्यांची तेवढी वर्दी महाराजांपर्यंत पोंचीव पाहूं. " ]

**भामि०**—पाहूं दे मला, कोण आले आहेत ते. [ जाते.

**धैर्य०**—वसंतोत्सवाशिवाय इतर कामाकरितां जर कोणी या वेळीं आले असते तर त्यांचें तोंड देखील पाहिलें नसतें. वनमाले, तूं कशाला श्रम घेतेस; मीच पाहतों, कोण आले आहेत ते. [ जातो.

## प्रवेश ३ रा.

( लक्ष्मीधर प्रवेश करितो. )

**लक्ष्मी०**— सेनापतीसाहेबांशीं बोलतांना मुख्य मुद्द्याची गोष्टच बोलायला मी विसरलों. विलासधरजींनीं मला इतकें पढवलें, पण पालथ्या घागरीवर पाणी ! आतां सगळें आठवलें; भामिनीचा सूड उगविण्याकरितां त्यांना सांगायाचें होतें, वनमालेसारख्या गरिबांच्या मुली वर्तनानें आपल्या तशाच असतात, तेव्हां तुम्ही सावध रहा. गरिबांच्या बायकामुली शीलानें कुशीलच असायाच्या, असा आम्हां श्रीमंतांचा सिद्धांत आहे.–कशी माझी दांतखिळी बसली !- हे विलासधर अजून काय त्यांच्याशीं कुजबुजत आहेत! वा! ते दोघे अजून त्या दालनांत बोलत उभे! आपणास बुवा असें तिष्ठत उभें राहण्याचें जिवावर येतें. आम्ही श्रीमंत लोक प्रहरानुप्रहर, दिवसानुदिवस हांथरुणांत लोळत राहूं; खाणें, पिणें, बोलणें सर्व कांहीं लोळत करूं; पण पाय ताठवून दोन पायांच्या खांबावर शरीर उभें करण्याची ही त्रासदायक युक्ति–मजुराप्रमाणें राबणाऱ्या या दरिद्र्यांनीं शोधून काढलेली ही युक्ति–आम्हांला बिलकूल पसंत पडत नाहीं. इतक्या वेळ त्यांना उभें राहवतें कसें! परमेश्वराच्या या श्रीमंती सृष्टींत विधात्याचा डोळा चुकवून जर हे दरिद्री शिरले नसते, तर जन्माच्या वेळीं देवानें जसें आम्हांला लोळत झोंपीं गेलेले पाठविलें तसेंच लोळत आम्ही श्रीमंत आमरण राहिलों असतों. या बाजूचें त्या बाजूवर वळावें, केव्हां केव्हां उताण्याचें पालथें व्हावें, फार झालें तर फरफटावें किंवा रांगावें, पण यापलीकडे यातायात आम्हीं श्रीमंतांनीं कां सोसावी?—असें उभें राहण्याचा प्रसंग आला म्हणजे ही सृष्टि निर्माण करण्यांत श्रीमंतांची सोय

देवानें पाहिली नाहीं, हें तेव्हांच ध्यानांत येतें. आमच्या अंगावरील मांस लोण्याच्या गोळ्याप्रमाणें मऊ आहे, हें ठीक आहे; पण ही हाडें इतकीं कठीण कशाला? कशीं आंतून टोंचताहेत! देवा, आमचीं हाडें सोललेल्या केळ्यासारखीं केलीं असतींस तर चाललें नसतें का? आंतून हे हाडाचे भाले आणि वरून हे हिऱ्याचे खडे कसे माझ्या अंगांत खुपताहेत! देवा, हिरे फुलासारखे कोमल कां नाहीं केलेस? श्रीमंतांच्या अंगाला चिकटून राहणाऱ्या पातळ तेलाचें रूप, देवा, सोन्याला कां नाहीं दिलेंस? या जाजमाखालची कठीण जमीन वढावाच्या आंतूनही माझ्या पायांत रुतते आहे! देवा, ही जमीन फत्तरांची व मातीची करावयाला सांगितलें होतें कोणीं?—तारामंडळ निर्माण करण्यांत देवाची सर्व श्रीमंती खर्चून जाऊन ही पृथ्वी निर्माण करितांना देव खरोखर कंगाल झाला असला पाहिजे! दरिद्री देवाशिवाय जड दगड आणि माती पृथ्वीच्या उरावर रचण्याचे एवढे श्रम कोण सोसणार? देवा, मजसारख्या एखाद्या श्रीमंताला जर तूं त्या वेळीं आपला गुरु केला असतास तर दोन दोन, चार चार हात उंचीच्या पिंजलेल्या मऊ रेशमानें व कापसानें ही पृथ्वी फार अल्प श्रमांत झांकतां येते, हें त्यानें नसतें का तुला शिकविलें? देवाच्या या सर्व चुका आमच्या महालांत आम्ही थोड्या थोड्या दुरुस्त करतों; पण या धैर्यधराचे भेटीला आलें म्हणजे दरिद्र्यासारखेंच वागावें लागतें! येऊं या आपण लोळण, श्रीमंतांच्या हालचाली कशा असतात हें तरी त्याला शिकूं द्या. ( बसून पाय पसरून ) आतां जरा बरें वाटलें.—अजून ते दोघे तेथेंच उभे आहेत.—आतां लागेल तितका वेळ बोलत उभे रहा.

[ पद ४८.- " देखो सखि आज " या चालीवर. ]

**लोळणचि भूमिवरि मोक्ष वाटे मना ॥ ध्रु० ॥ देह होई उलट पलट मग कालसम उच्चनीच अवयव मिसळत क्षणाक्षणा ॥ १ ॥ लोळणा, अनुसरत भूभ्रमण गोलगति पाळणा, शयनसुख सहज देई जना ॥ २ ॥**

[ विलासधर व धैर्यधर येतात.

---

४८ (चाल—देखो सखि आज, झपताला.)

सां – प ध प म् रे म् सा रे रे नी सा रे प (पमंप) प (धनीसांरे)
लो ऽ ळ ण चि भू ऽ मि व रि मो ऽ क्ष वा ऽ टे ऽ म ना ऽ
* – ० – * – ० –

॥ ध्रु० ॥

[ पुढें चालू

आणखी थोडा वेळ बोलत उभें रहायला कोणीं नको म्हटलें होतें. जरा लवंडतों तों आले! हिथें नोकरचाकरही नाहीं कोणी हात देऊन उभें करायला.

[ उठूं लागतो.

**विला०**—कां लवंडलांसे? [ हात देऊन उठवितो.

**लक्ष्मी०**—तसें नाहीं; मघाशीं सेनापतीसाहेबांना विनंति करायला विसरलों. ती आठवण झाली, आणि त्या आठवणीचे हातपाय पकडून अशी धरून ठेविली.

**विला०**—हो, खरें. तुम्ही ती विनंति करायला विसरलांच!—यांची एक विनंति आहे—

**धैर्य०**—वा! असें विसरलें तरी काय?

**लक्ष्मी०**—मला लोकांनीं सांगितलें, आपण सांप्रत सकुटुंब सपरिवार आहां; तेव्हां वयनीसाहेबांना आमच्या गांवच्या वसंतोत्सवाचें आमंत्रण कसें करायचें? माझें कांहीं लग्न झालेलें नाहीं; सेनापतीसाहेबांच्या मर्जीला येत असेल तर विलासधरजींना आग्रह करून त्यांच्या राणीसाहेबांकडून आमंत्रण देववितों.

**धैर्य०**—अहो, तसें कांहीं नाहीं.

**लक्ष्मी०**—आमच्या गांवीं मुक्काम व्हावयाच्या आधीं दोन दिवस पुन्हा दर्शनाला येईन; त्या वेळीं आपण सांगाल तशी वयनीसाहेबांच्या आमंत्रणाची व्यवस्था करून—

**धैर्य०**—व्यवस्था कांहीं करायला नको. तसें कांहीं नाहीं; तुमच्याप्रमाणें माझेंही लग्न झालेलें नाहीं.

**विला०**—म्हणजे?

---

रे – प प – नी ध नी सां सां नीं ध नी सां रें नीं सां ध प प
दे ऽ ह हो ऽ ई ऽ उ ल ट प ल ट म ग का ऽ ल स म
* – ० – * – ० –

ध सां ध प ध प (मंरे) म् सा रे रे नी सा सा रे प – प (धनीसांरें)
उ ऽ ब नी ऽ च अ व य व मि स ळ त क्ष णा ऽ क्ष णा ऽ॥११॥*
* – ० – * – ० –

* "लोळणा-अनुसरत" वगैरे "देह होई" प्रमाणें.

**लक्ष्मी०**—म्हणजे ! मग त्या कोण ?

**विला०**—मग त्या कोण ?

**लक्ष्मी०**—मग त्या कोण ? मला तर ज्यानें त्यानें सांगितलें-

**धैर्य०**—( स्वगत ) काय करावें ? लोकांना ही उठाठेव कोणीं सांगितली ?

**विला०**—मग त्या कोण ?

**धैर्य०**—कोण आणि काय, तुम्हांला काय करायचें ! विलासधरजी, या गोष्टीचा उलगडा कांहीं काळानें आपोआप होईल; आणि मीही सर्व कांहीं तुम्हांला सांगेन;—

**लक्ष्मी०**—सांगायला नको. समजलें, आम्हांला समजलें. सेनापतीसाहेब, या वेळीं मला खरोखर आनंद होतो आहे. महाराजांनीं पंचवीस लाखांची जहागीर देऊन आपणाला श्रीमंतांच्या वर्गांत घालण्याबरोबर पिढीजाद श्रीमंतांचेही पुढारी व्हायला आपण लायक आहां, हें असल्या नाजुक कृतीनें दाखविण्याची आपण सुरवात केली; मला खरोखर आनंद होत आहे. आपल्यासारखा असला कर्ता पुढारी आम्हां श्रीमंतांना पाहिजेच होता. आपल्या अंगीं हें श्रीमंतीचें खरें लक्षण चांगलें जागतें आहे, हें मीं पूर्वींच ताडलें होतें; केव्हां ? आलें का ध्यानांत विलासधरजी ?

**विला०**—त्या दिवशीं--त्या रात्रीं—त्या चोरांच्या गांठीच्या रात्रीं–

**लक्ष्मी०**—बरोबर ! बरोबर ! त्याच रात्रीं. आम्ही आणि सेनापतीसाहेब नेमके कसे त्या वनमालेच्या दारांत एकमेकांना भेटलों ! तेव्हांच माझ्या ध्यानांत आलें, श्रीमंतीचें लक्षण सेनापतीच्या अंगीं पुरें आहे .आपली नेमकी गांठ पडली म्हणून मला त्या दिवशीं बिलकुल वाईट वाटलें नाहीं.

**विला०**—नाहीं, सेनापतीसाहेबांना त्याबद्दल वाईट वाटत नाहीं.

**लक्ष्मी०**—हें चालायचें. आपण लग्नाच्या फंदांत न पडतां असला संबंध आपणाला प्रिय झाला, हीच संतोषाची गोष्ट. माझें लग्न झालेलें नाहीं, आपली मर्जी असली तर मी स्वतः आपल्या घरांत—नव्हे—घरांतच म्हणायचें—आमंत्रण द्यायला येईन.

**धैर्य०**—त्याची कांहीं जरूरी नाहीं.

**विला०**—आपल्याजवळच आमंत्रण दिल्यानें त्या रागावतील. घरच्यापेक्षां असल्या संबंधांत मानापमानाचे प्रश्न फार नाजुक असतात–

**लक्ष्मी०**—असल्या संबंधाच्या सर्व गुंतागुंती मला जितक्या समजतात तितक्या दुसऱ्या कोणालाही–आपल्यापुढें मी प्रौढी मिरवूं नये पण–हें ज्ञान आम्हांला पिढीजाद आहे. तेव्हां म्हणतों मी स्वतः आमंत्रण देऊं का माझ्या तसल्या ओळखींचें एखादें माणूस—

**धैर्य०**—या उठाठेवीची कांही जरूरी नाहीं. आमचा मुक्काम बहुतेक तुमच्या गांवाजवळ व्हावयाचाच नाहीं; तेव्हां कसलीच जरूरी नाहीं.

**लक्ष्मी०**—राग आला वाटतें ! मी स्वतः आमंत्रण देण्याचा हट्ट धरीत नाहीं, आपल्यापाशींच त्यांचेंही आमंत्रण देतों; पण आपण आमच्या गांवीं आलेंच पाहिजे.

**धैर्य०**—नको, ही वाटाघाट नको. विलासधरजी, मी तुमच्या गांवीं येईन; यांच्या गांवीं येईनच असें नाहीं.–या, आतां या हं.–पण हें पहा, जरा थांबा. लक्ष्मीधरजी, मला स्पष्ट सांगा, तुम्ही वनमालेबद्दल आतां जें बोललां,—

**विला०**—अहो, त्यांत काय अर्थ आहे ? किती वनमालेचीं नांवें यांच्या तसल्या यादींत सांपडतील, थांग काय लागणार !

**लक्ष्मी०**—अहो, श्रीमंतांचें दर्शन झालें म्हणजे गरिबांच्या बायकामुलींचें तसें पाऊल पडायचेंच; त्याची एवढी विचारपूस कशाला ?–शिवाय मी आपणाला स्पष्ट सांगतों, माझ्या या असल्या ओळखीदेखीं थोडा वेळ टिकतींत. आमच्या वडिलांनीं हा आम्हांला कित्ता घालून दिला ! त्यांचें नेहमीं म्हणणें असे, एकशें आठ धर्मशाळा फिरून येणाऱ्या बाहेरख्याली प्रवाशाला पृथ्वीप्रदक्षणेचें फल मिळतें. आमच्या वडिलांनीं असलें पुण्य संपादन केलें ! मी श्रीमंत आहें तरी हुद्याचा मोठेपणा मला अद्याप मिळालेला नसल्यामुळें वडिलांच्या इतका माझा लौकीक झालेला नाहीं; पण आपला जर पाठिंबा मला मिळाला-तर वडिलांचें नांव दुपटीतिपटीनें गाजविल्याशिवाय मी राहणार नाहीं.

**धैर्य०**—तुमच्या कुळाची ही कर्मकटकट मला नको आहे ऐकायला. विला-

सधरजी, यांना येथून घेऊन जा; नाहीं तर मी तुमच्याही गांवीं मुक्काम करणार नाहीं. या, आतां या.

**विला०**—चला; सेनापतीसाहेबांची तब्येत सध्यां ठीक नाहीं; त्यांना असें ताटकळत उभें करणें योग्य नव्हे. चला, येतों आम्ही. ( जाऊं लागतात ). ( लक्ष्मीधरास ) आज तुम्ही खरी श्रीमंती गाजविलीत. ही गोळी नेमकी लागली. हा न येईना तुमच्या गांवीं; यानें भामिनीला टाकली म्हणजे ती एकटी आपोआप आपल्या पायांनीं तुमच्याकडे चालत येईल. चला. [ जातात.

**धैर्य०**—( स्वगत ) काय याची ही श्रीमंती आणि काय याच्या या श्रीमंतीच्या वल्गना! श्रीमंतीच्या वृक्षाला जर हीं असलींच नासकींकुचकीं विषारी फळें लागावयाचीं असलीं, तर श्रीमंतीच्या सावलीखालीं मला, देवा, कशाला उभें केलेंस! दारिद्र्याच्या रखरखलेल्या उन्हांत उभा असतांना मी काय कमी सुखी होतों? वनमालेसारख्या निर्मल, निष्पाप, व सतेज मनाचें अधःपतन होण्याला जर याची श्रीमंती कारण झाली असेल—नाहीं, हा म्हणतो त्याप्रमाणें पापाचा विटाळ तिला झालेला नाहीं. तिच्याबद्दल संशय घेणेंच म्हणजे मूर्खपणा आहे.—असल्या आचरट पाप्यांवर रागावण्यांतही कांहीं अर्थ नाहीं; मला राग येतो तो देवाचा. पापाच्या प्रतापांत प्रौढी मिरविणाऱ्या चांडाळांना देवा, तूं लक्ष्मीच्या अंगाला स्पर्श कसा करूं देतोस? हे असले पापी श्रीमंत कसे असूं शकतात? पाप आणि श्रीमंती यांची मैत्री कां असावी? असले हलकट नरपशु लक्ष्मीशीं दाखवीत असलेली सलगी देवा, तूं कशी सहन करतोस? पूर्वींचा नरक पुरेसा नाहीं, असें पाहून यांना शिक्षा करण्याकरितां नवीन नरक तयार करावा, तो यांच्या पापाची धांव त्याही नरकाच्या पलीकडे जावी, अशा रीतीनें शर्यत हरल्यामुळें देवा, पुढें काय करावें हें तुला सुचेनासें झालें आहे काय? हो, असेंच असलें पाहिजे; एरवीं आम्हां गरिबांकडे ही लक्ष्मी स्वतः कशाला चालून आली असती? या पाप्यांच्या कचाट्यांतून मला सोडविण्याचें सामर्थ्य माझ्या नवऱ्याचेही अंगांत नाहीं, तेव्हां तुम्हीं—देवाच्या सत्त्वशील मुलांनीं—तरी मात्रागमनाचें पातक करूं पाहणाऱ्यांच्या हातून आपल्या आईला सोडविलें पाहिजे, असा आक्रोश ही तीन चांदांची लक्ष्मी माझ्या कानींकपाळीं आतां करूं

लागली आहे. राजधानीला पोंचल्याबरोबर महाराजांना विनंति करून प्रथम हेंच करितों.

[ ४९.—" आई समधन मेरिरे " या चालीवर. ]

**भूपा विनवुनि मी करीं वेगें ही धनमदनाशसोज्ज्वला मही ॥ ध्रु० ॥ विपुल सबल फल वाहि कृषिवल, जो धरि महीला निर्मला अति; निवडे बहु खडे, तो विभव पाही ॥ भूपा ॥ १ ॥**

**[ चौथा अंक समाप्त. ]**

---

४९ राग–मिय्याचा मल्हार, ताल एका.

नी सा म्रे म् रे सा नी सा म् र प म् नि् ध सां (धंप) (गमंगमं)
भ ऽ पा ऽ वि न वु नि मी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ क रीं ऽ ऽ

म् – रे —— सा ——नि् ध नि् ध सा सा रे – प ग् म् रे
वे ऽ ऽ ऽ ऽ ऽ गें ऽ ऽ ऽ ऽ ऽ ही ऽ ध न म द ना ऽ श सो ऽ ज्व

नी सा रे सा नि् ध (नीसारेम्) रे सा नी सा म्
ला ऽ म ही ऽ ऽ ऽ ऽ वि न वु नि मी ... ॥ ध्रु० ॥

म् प प प नि् ध नी सां – सां – सां नि् ध नि् ध नी सां नी
वि पु ल स ब ल फ ला ऽ वा ऽ हि कृ षि व ल जो ऽ ध

सां रें ध नि् प — पंम्— प ध नी सां ध प म् प ग् – म् रे म्
रि म ही ऽ ला ऽ ऽ नि ऽ र्म ला ऽ ऽ अ ति नि व डे ऽ ब हु ख

प – रें नी सां धंनि् धंनि् प म् प ग् – रे सा रे म्
डे ऽ तो ऽ बि भ व पा ऽ ही ऽ भू ऽ पा ऽ ...... ॥ १ ॥

# अंक पांचवा.

## [ प्रवेश १ ला. ]

**स्थळ**—शंकराचें मंदिर.

( भामिनी प्रवेश करिते. )

**भामि०—**

[ पद ५०—" प्यारे परदेस न " या चालीवर. ]

**दोष खल देत न, देहा देई या साधुता। धनदूषिता या मना खल देई, जीवा या, देहा या, साधुता ॥ ध्रु० ॥ निर्धना बहुगुणा नमता सहज मिळे ती साधुता। शिकवी मजला, सधनीं पाहीं पापा, साधुता ॥ १ ॥**

---

५० राग–मांड, धुमाळी.

धंनिंसां – सां सां सां नि सां नि रें सां नि ध
दो ऽ ष ख ल दे ऽ ऽ ऽ त न
० – * – ०

प – प ध ध रें सां नि ध प प ध नि ध प म प – मग –
दे ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ई ऽ ऽ ऽ ऽ ऽ दे ऽ हा ऽ
– * – ० – * – ० – *

मंगरेसा — सांरेंग – ग गंरें सा – | सा सा ग – म प ——
या ऽ ऽ सा ऽ धु ता ऽ ऽ | ध न दू ऽ षि ताऽऽऽऽ
– ० – * – ० – * – ०

नी – नी सां ——— सां रें ग –म ग रें सां सांरें नि सां
या ऽ म ना ऽऽऽऽऽ ख ल दे ऽई ऽ ऽ ऽ जीऽ वा ऽ
– * – ० – * – ० – * ०

[ पुढें चालू

लक्ष्मीधराच्या अंगीं मूर्खपणाबरोबर इतका दुष्टपणा भरलेला असेल, असें माझ्या स्वप्नांत देखील आलें नाहीं. मूर्खपणानें गळ्यावर तलवार ठेविली काय आणि दुष्टपणानें ठेविली काय, तलवारीची धार गळा सारखाच कापीत जाते ! त्या दिवशीं धैर्यधरजी त्या मेल्याची सरदारकी काढून घेण्यास उत्सुक झाले होते, पण मीं गय केली. सापाला दूध पाजलें असतांना तो जसे उपकार फेडतो तसे या मेल्यानें माझे उपकार फेडले ! त्याची सरदारकी काढून घ्यायचें जर तिकडच्या मनांत पुन्हा आलें, तर मी कधीं कधीं दया करा म्हणून म्हणायची नाहीं.

[ धैर्यधर येतो.

धैर्य०—वनमाले, बाहेर बगीच्यांत वसंतोत्सवाचा कोण थाट चालला आहे ! गाण्याला आणि नाचण्याला जणूं ऊत आला आहे, आणि तूं असें हिरमुसलें तोंड करून एकीकडे का येऊन बसलीस ? तो लक्ष्मीधर मजपाशीं तसें बोलला—छे, मीं उगीच पुन्हा तुला त्याच्या बरळण्याची आठवण केली; तूं

नि ध प – प ध म् – ग – ( रेंसा) सांरेंग – ग
या ऽ ऽ ऽ दे ऽ हा ऽ या ऽ ऽ सा ऽ धु
– ० – * – ० –
गंरें सा———
ता ऽ ऽ ऽ ऽ ऽ ॥ ध्रु०॥
* – ०
नि – सा ग – सा ग म् प – प सां सां – प ध प म्
नि ऽ र्ध ना ऽ ब हु गु णा ऽ न म ता ऽ स ह ज मि
– * – ० – * – ० –
गं – मं गंरें सा सांरेंग ग गंरेंसा ——— | नि सां नी रें सां नि
ळे ऽ ती ऽ ऽ सा ऽ धु ता ऽ ऽ ऽ ऽ ऽ | शि क वी ऽ म ज
* – ० – * – ० – * –
ध प ध नि सां ——— पंध ——— मंप ——— मंगं ———(मंगंरें सा)
ला ऽ स ध नी ऽ ऽ ऽ पा ऽ ऽ ऽ हीं ऽ ऽ ऽ पा ऽ ऽ ऽ पा ऽ ऽ ऽ ऽ
० – * – ० – * – ० – * – ०
सा ऽ धु ता ऽ ऽ ऽ ऽ ऽ ॥ १ ॥
– * – ०

१निर्धना बहुगुणा नमता सहज मिळे ती साधुता । दोष खल देत न इत्यादि ।

अशी दीन मुद्रेनें–हे अश्रु कां म्हणून डोळ्यांत ? असल्या निर्मळ डोळ्यांचा, असल्या निष्पाप चेहऱ्याचा, असल्या कोमल मनाचा कोणाला कधीं तरी संशय येईल का ?

**भामि०**—पण आपणांला आला होता !

**धैर्य०**—मला नव्हता संशय आला. तुला सर्व गोष्टी कळलेल्या असाव्यात म्हणून; तुजपाशीं बोललों, इतकेंच. आणि जरी आला असला तरी तुझ्या डोळ्यांतला एक अश्रुबिंदु असले हजारों संशय धुवून टाकण्यास समर्थ नाहीं काय ? नाहीं, मी पुन्हा त्यासंबंधानें एक चकार शब्दही बोलणार नाहीं. तूं म्हणत होतीसना, तुझे वडील आज आल्यावर माझी आपोआप खात्री होईल म्हणून. मला त्याचीही जरूर नाहीं. कोणी कांहींही म्हणोत, तूं या क्षणापासून माझी धर्मपत्नी झाली आहेस, आणि श्रीमंत किंवा गरीब कोणाचेही शब्दांत किंवा मनगटांत माझ्या हातांतला हा तुझा हात दूर करण्याची शक्ति नाहीं, हें तूं पक्कें समज.

**भामि०**—आणि आपला हात जरी कर्मधर्मसंयोगानें आपणाला मजपासून दूर न्यावा लागला—

**धैर्य०**—रणाङ्गणावर शत्रूंशीं झुंझण्याकरितां कदाचित् दूर होईल—

**भामि०**—तरी आपल्या या अर्धांगीचा हात आपल्या हाताशीं नेहमीं, देहानें नाहीं तर वाचेनें आणि मनानें, असाच संलग्न राहील. ( विनोद व कुसुम येतात. ) अग बाई ! बाबा आले वाटतें. बरें झालें, वेळेवर आले ! ते आले म्हणजे लक्ष्मीधरासंबंधाची हकीकत–नाहीं,–मुद्दाम म्हणून त्यांच्या कानावर घालायचीच होती.

**धैर्य०**—तसें करून काय करायचें आहे ? माझ्या मनांत जर संशयच नाहीं तर—

**भामि०**—त्याकरितां नव्हे, पण सगळ्या गोष्टी आपणांला व बाबांना समजलेल्या असणें चांगलें नव्हे काय ?–पण हें काय ? बाबा कसे यांच्या बरोबर आले नाहींत ?–काय ग पुष्पमाले, बाबा येथें आले आहेत ना ?

**विनो०**—बाबासाहेब आले आहेत; पण भामिनीबाईसाहेब-तसें नव्हे–सरकार–काय ग पुष्पमाले, सरकारचे वडील आले आहेत, का दुसऱ्या कोणाचे बाबासाहेब आले आहेत, सांगशील कीं नाहीं ?

**कुसु०**—वनमाले, तुझे वडील आले आहेत हो !

**भामि०**—बरें झालें, देवानें काळजी दूर केली.

**धैर्य०**—मग त्यांना येथें कां घेऊन आली नाहींस ?

**कुसु०**—ते एकटे आले नाहींत. भामिनीताईसाहेबांच्या बाबासाहेबांबरोबर ते आले आहेत. या वसंतोत्सवाचे वेळीं आपल्या दर्शनाला येण्याचा बेत जेव्हां वनमालेच्या वडिलांनीं केला–

**भामि०**—मी त्यांना इतक्या घाईनें—तातडीनें—कां बोलावलें, सगळें त्यांना नीट सांगितलेंस ना ?

**कुसु०**—हो, मीं सगळें सांगितलें. विलासधरजी, व लक्ष्मीधरजी येथें कां व कसे आले होते, महाराजांचीं व त्यांचीं कोणकोणचीं बोलणीं झालीं, महाराजांच्या प्रेमांत संशयाचें विष कालवायचा त्यांनीं उद्योग कसा केला, सगळें सगळें सांगितलें. तेव्हां भामिनीचे बाबासाहेब म्हणाले, मीच येऊन धैर्यधरजींना सांगतों, आपण बायको पण बायको निवडून काढली असून वनमाला गंगोकाप्रमाणें शुद्ध आहे. म्हणून तेही यायला निघाले.

**विनो०**—आणि भामिनीही त्यांच्या बरोबर निघाली. सेनापतीसाहेबांनीं लग्न मजबरोबर नाहीं केलें तर नाहीं केलें; पण माझी दासी होऊन जी राहणार होती तिच्याशीं लग्न केलें, एवढा तरी मला आनंद आहे, असें भामिनी म्हणाली !

**कुसु०**—भामिनी, भामिनीचे बाबासाहेब, वनमालेचे वडील, आपले श्वशुर, सर्व सर्व आज येथें आले असून आतां इतक्यांत सरकारच्या दर्शनाला येतील. मी त्यांना घेऊनच येणार होतें; पण भामिनी सगळे दागीने अंगावर घालून नटायला लागली !

**धैर्य०**—आपल्या श्रीमंतीचा दिमाख तुला दाखवायचा आहे वाटतें भामिनीच्या मनांत ! येऊं दे, तिला सगळे दागीने अंगावर घालून येऊं दे. या सौंदर्याकडे पाहिलें कीं सगळे हिरे, मोतीं फिके पडतील, आणि दासीची दासीही होण्याची आपली योग्यता नाहीं असें तेव्हांच तिला समजेल. येऊं दे तिला दागीने घालून. या श्रीमंतांच्या बायकांना समजलेंच पाहिजे, दागीने म्हणजे स्वरूप नव्हे.

**विनो०**—बाबासाहेब अगदीं आपल्यासारखेंच बोलले; वनमालेला भामिनीनें हिणविण्याचें कारण नाहीं, असें त्यांनीं बजावलेंही. तेव्हां भामिनी रागावून म्हणाली—

**भामि०**—काय चाहटळपणा चालवला आहेस रे विनोदा! त्या श्रीमंताच्या अल्लड पोरीच्या रागाचा बाऊ कसला इकडे दाखवतो आहेस?

**धैर्य०**—बाऊ कसला आला आहे त्याच्यांत? या लग्नाच्या कामांत श्रीमंतांची पुरी फजीती झाली म्हणून रागारागानें कांहीं तरी बडबडली असेल झालें! काय म्हणाली रे?

**विनो०**—तिनें रागारागानें अंगावरचे दागीने सगळे फेकून दिले. गळ्यांतली माळ तोडली, पायांतल्या सांखळ्या काढल्या—

**कुसु०**—आणि माझ्या स्वाधीन ते दागीने करून म्हणाली, अंगाखांद्यावर कांहींएक न घालतां मी अशी येतें, त्या वनमालेच्या अंगावर सगळे दागीने घाला, पाहूं कोण अधिक सुंदर दिसतें तें!

**विनो०**—बाबासाहेब म्हणाले, शौर्याप्रमाणें लक्ष्मीशींही अशा अरदांडपणानें वागणारी मुलगी मी हट्टानें धैर्यधरजींच्या गळ्यांत बांधणार होतों, या माझ्या अपराधाची भरपाई म्हणून आणि सेनापतीसाहेबांवरचें माझें प्रेम कमी झालें नाहीं हें दाखविण्याकरितां हे दागीने मीं वनमालेला अर्पण केले आहेत, असें धैर्यधरजींना सांगा.

**कुसु०**—तेव्हां बाबासाहेब येण्यापूर्वी वनमालेला दागीने घालण्याकरितां मी पुढें आलें. भामिनीनें आग्रह करून सांगितलें आहे, हे दागीने वनमालेनें अंगावर घातलेच पाहिजेत.

**भामि०**—माझी सवत होऊं पाहत होती नव्हे का? भामिनीचे दागीने अंगावर घालायला माझें खेटर अडलें आहे.

**धैर्य०**—श्रीमंतीप्रमाणें रूपाचाही गर्व भामिनीला झालेला दिसतो! पाहिलीच पाहिजे ती रूपानें कशी काय आहे ती. तिला ज्याअर्थी सौंदर्याचा इतका गर्व झालेला आहे त्याअर्थी तुझ्या पासंगाला तिचें रूप लावण्यास कांहीं हरकत यावयाची नाहीं. तूं पाहिली आहेसना तिला? आहे का, रूपानें कांहीं बरी आहे का?

**भामि०**—आपणाला काय करायचें तिचें रूप ?

**धैर्य०**—मला तुझ्या रूपाशिवाय दुसऱ्या कोणाच्याही रूपाचें कांहीं करायचें नाहीं. पण स्वतःशीं हितसंबंध येत असलेल्या सर्व गोष्टी जशा ऐकलेल्या असाव्यात तशा पाहिलेल्याही असाव्यात.–काय रे विनोदा, भामिनीचें रूप कसें काय आहे ?

**विनो०**—तिनें अंगावरून दागीने काढले म्हणजे हुबेहुब वनमालाबाईसाहेब, आणि अंगावर दागीने घातले की भामिनी ! म्हणून म्हणतों, महाराज, यांना हे दागीने अंगावर घालूंच देऊं नयेत; कारण अंगाखांद्यावर दागीने न घालणाऱ्या भामिनीलाच वनमाला समजून आपलें लग्न चुकून भामिनीशीं व्हावयाचें !

**धैर्य०**—तूं इतकें वर्णन करितो आहेस, तेव्हां असेल चारचौघींसारखी; नाक नाकासारखें, डोळे डोळ्यांसारखे, कान कानांसारखे झालें ! परमेश्वरानें डोळे निर्माण करावेत आणि ते हिरे दिसावेत, हा असला चमत्कार–

**भामि०**—इकडच्याप्रमाणें भामिनीच्या चेहऱ्यांत कोठचा असणार ?

**धैर्य०**—तें कसेंही असो म्हणा, पण भामिनी सुंदर नसली पाहिजे, एवढें मी खात्रीनें सांगतों.

**भामि०**—तें कशावरून ?

**धैर्य०**—श्रीमंतांना एक मोठी खोड लागलेली असते; ती तुला माहीत नाहीं, म्हणून तूं असें विचारतेस. श्रीमंतांना वाटत असतें, लोक आपल्या चेहऱ्याची तारीफ करतात, त्याप्रमाणें खरोखरच आपण सुंदर आहों. लोकांना श्रीमंतांचा पैसा सुंदर दिसत असतो, चेहरा कांहीं दिसत नसतो, हें श्रीमंतांना कांहीं केल्या समजत नाहीं. मीं कित्येक श्रीमंत असे पाहिले आहेत कीं, त्यांना जर गरिबांचा वेष दिला आणि रस्ते झाडायला ठेवलें, तर असलें खापरतोंड वारंवार नजरेस पडून ओकारीचें दुखणें जडेल म्हणून सर्व लोक तक्रार करतील ; पण त्या बिचाऱ्यांना वाटत असतें, दुनिया आपल्या सौंदर्यावर झुलते आहे ! माझी अटकळ आहे, भामिनीची सौंदर्याविषयींची ऐट अशाच मासल्याची असावी.

**भामि०**—नसेल म्हणून कोणीं म्हणावें ?

**धैर्य०**—म्हणून मी म्हणतों तिची फटफजीती होण्याकरितां हे दागीने—

**भामि०**—मी नाहीं भामिनीचे दागीने अंगावर घालावयाची.

**धैर्य०**—आपण जर या वेळीं राजधानींत असतों तर लागेल तितक्या दागिन्यांची रास मी तुझ्यापुढें रचली असती. भामिनी व बाबासाहेब येथें येऊन पोंचण्यापूर्वीं त्यांचे डोळे दिपून जातील अशी तूं सजली पाहिजेस ! तेव्हां म्हणतों, बाबासाहेबांनीं पाठविलेले हे दागीने मी माझ्या हातांनीं तुझ्या अंगावर घालतों, मग तर झालें ?

**भामि०**—मी सांगितलेंना, ती भामिनी माझी सवत होण्याकरितां आतां येथें येत आहे. सवतीच्या दागिन्यांचा विटाळ मी कधीं माझ्या अंगाला होऊं द्यायची नाहीं. [ शीलधर येतो.

**धैर्य०**—वा ! शीलधर ! आणि हे काय आणले आहेस ? रजा संपण्यापूर्वींच तूं कसा येथें आलास ?

**शील०**—सरकार, रजेच्या दिवसांत मी राजधानींत गेलों असतांना पृथ्वीधर महाराजांचें दर्शन झालें. लढाईसंबंधानें, लष्करासंबंधानें, आणि सेनापतीसाहेबासंबंधानें गोष्टी निघाल्या असतांना महाराजांनीं मला एकदम प्रश्न केला,—

**धैर्य०**—काय विचारलें ?

**शील०**—सेनापतीसाहेब राजधानीकडे एकटे येत नसून आपल्या भावी भार्येसह येत आहेत, हें खरें काय ? महाराजांनीं असा प्रश्न विचारावा यांत कांहीं आश्चर्य नाहीं; कारण लहानथोर सर्वांच्या तोंडीं सांप्रत हाच विषय आहे. आणि वनमालाबाईसाहेब कोण, कुठल्या, काय, असल्या प्रश्नांना उत्तरें देतां देतां मला पुरे वाट झालें आहे. आपली व बाईसाहेबांची प्रथम भेट कोठें, कशी, व कां झाली, इथपासून रजेवर जाईपर्यंतची सर्व हकीकत मी महाराजांना निवेदन केली. आपलें लग्न ठरल्याची बातमी तर मला समजायच्या अगोदरच लोकवार्तेनें महाराजांच्या कानावर घातली होती.

**धैर्य०**—आमचें लग्न ठरण्यापूर्वींच लोकांना ही बातमी कशी समजली ?

विनो०—पांचा मुखीं परमेश्वर असतो; आणि त्या देवालाही सर्व मजप्रमाणेंच साहजिक अगोदर समजतें.

शील०—हें लग्न ठरल्याचें ऐकून महाराजांना आनंद झाला; आणि मला निरोप कळवायला सांगितलें आहे, लग्नसमारंभ राजधानींतच झाला शिवाय वनमालाबाईसाहेब राजकन्या आहेत असें समजून राजकन्येस वधूपक्षाचा थाट महाराज स्वतः ठेवणार आहेत. वनमालाबाईसाहेबांना महाराजांच्या तोंडून ज्या वेळीं "राजकन्या" हा शब्द निघाला, त्या वेळे राजकन्येचा दर्जा बाईसाहेबांना प्राप्त झाला. त्या वैभवाचा हा पोषाख अलंकार बाईसाहेबांना अर्पण करण्याकरितां महाराजांनीं मला पाठविलें ब

[ दागीने व पोषाख

धैर्य०—वनमाले, बरें झालें; मधांशींच शंकराला साक्षी ठेवून लग्नाच्या शपथा घेतल्या, नाहीं तर गरिबाच्या मुलीशीं लग्न करण्या राजकन्या माझ्या गळ्यांत पडली असती. बाकी भामिनीपेक्षां राजक बरा ! तुला ते भामिनीचे दागीने नको होतेना ? हे महाराजांनीं पाठ दागीने अंगावर घाल आणि भामिनी आली कीं तिचा चेहरा निस्तेज शीलधरजी, हिचे वडील आम्हांला भेटायला आले आहेत. वसंतोत्सवाचे जर आले असले तर येथपर्यंत घेऊन या, म्हणजे राजकन्येचे वस्त्रालंकार दिल्याहूनही अधिक आनंद वनमालेला होईल.

शील०—आज्ञा, सरकार. [ ज

धैर्य०—पुष्पमाले, तुझ्या मैत्रिणीच्या अंगावर हे दागीने घाल. ( पड वसंतोत्सवाचें गाणें. ) हा पहा, गाण्यानें व नाचण्यानें वसंतोत्सव साजरा णाऱ्या मुलींचा मेळा इकडेसच येत आहे.—जा, पुष्पमाले जा. ओवरींत दा अंगावर घालायला तुझ्या मैत्रिणीला मदत कर, जा.

भामि०—वडिलांनीं किंवा महाराजांनीं पाठविलेल्या या दागिन्यां राशीपेक्षां प्रेमाच्या सेवेनें—स्वकष्टानें—संपादन केलेला हा दागीना पाहून बायको मला धन्य नाहीं का म्हणणार ?

धैर्य०—या मुख्य अलंकारासभोंवतीं किरकोळ दागिन्यांची प्रभावळ अ म्हणजे पायरीपायरीनें मुख्यापर्यंत जाऊन पोंचण्यास आम्हां गरिबांच्या नजं



मुली—किती मजेदार हार शिवभययुवतिशरण मदन गांच सुमन नागाकार ॥ ध्रु० ॥

शोईन्चें पडेल.-हें पहा, बाबासाहेब यायच्या आंत सर्व थाट करून घे; राजकन्या बनलेल्या वनमालेचें दर्शन सर्वांच्या अगोदर आम्हांला झालें पाहिजे.

[ वनमाला, व पुष्पमाला जातात.

विनोदा, थोडा वेळ येथें बसून या वसंतोत्सवाची गंमत तर पाहूं या.

[ नाचत व गात मुलींचा मेळा प्रवेश करितो.

मुली०—[ पद ५१—" नाचे छुम छुम " या चालीवर. ]

किती मजेदार हार, शिवभययुवतिशरण मदन रचि सुमन नानाकार ॥ ध्रु० ॥ येत हा मदनमित्र रणाला, सैन्य तया अबलाकरमाला । फुले फूल, पडे भूल; ज्ञानशूर मनीं चूर। वसंतसेना सरसावे ही, वैरागी समुदायीं होई हो हाहाःकार ॥ १ ॥ तोडुं या मुकुल सकल कुमारी, रास रचूं या रुद्रमंदिरीं । पहा हार, हरा, मार; ज्ञानलोचन झांकी मार । नाचे कुसुमायुध आनंदें, पुष्पवती शिवसमाधिसामोरा, तोरा फार ॥ २ ॥ [ शंकराला फुलें वाहून जातात.

५१ राग–भैरवी, ताल धुमाळी.

सा सा रे॒ ग॒ म॒ –(म॒पध)–प म॒ ग॒ रे ग॒ रे ग॒ रे ग॒ ग॒ सा रे॒ सा ग॒ रे॒
कि ति म जे दा ऽ र हा ऽ र शि व म य यु व ति श र ण म द न र चि
– * – ० – * – ० – * – ०

सा ध॒ नी॒ सा —— गं॒रे॒ -— सा—
सु म न ना ऽ ना ऽ का ऽ र ॥ ध्रु० ॥
– * – ०

ध॒--म॒ ध॒ –म॒ ध॒ नी॒ सां – सां सां(गं॒'रे॒')– सां – नीं॒ – नी॒ नी॒
ये ऽ त हा ऽ म द न मि ऽ त्र र णा ऽ ला ऽ सै ऽ न्य त
* – ० – * – ० – * –

सां – गं॒ गं॒ रे॒' – सां सां ध॒ – प – गं॒रे॒' —— ग॒ —— रे॒'
या ऽ अ ब ला ऽ क र मा ऽ ला ऽ फु ले ऽ ऽ फू ऽ ऽ ल प
० – * – ० – * – ० – *

[ पुढें चालू

**विनो०**—महाराज, या मुलींनीं तर शंकराला फुलांच्या समाधींत गाडूनच टाकले! आणि त्यामुळें हें रुद्रालय रुक्ष मंदिर न होतां प्रेममंदिर झालें आहे. बाबासाहेब आल्यावर वनमालेचें पाणिग्रहण जर आपण येथें केलें तर वसंतोत्सवाच्या या प्रेममंदिरावर कळस चढविल्यासारखें होईल.—मला वाटतें, बाबासाहेब शीलधरजींना कांहीं केल्या लवकर सांपडायचे नाहींत.—सरकारची आज्ञा होत असेल तर मींच बारीक तपास करून त्यांना हुडकून काढतों.

**धैर्य०**—कांहीं तरी कामगिरीचें मिष करून नाच पाहत त्या मुलींच्या मेळ्याबरोबर फिरायचें आहे वाटतें आपल्या मनांत!—जा, विनोदा जा, अशा या वसंतोत्सवाचे वेळीं तुझा हिरमोड नको व्हावयाला; जा, मौज कर.

**विनो०**—महाराज, काम आमच्या वांटणीला, मौज आपल्या वांटणीला ही मूर्तिमंत मौजच आपल्याकडे येत आहे.

[ जातो. पुष्पमाला व भामिनी येतात.

**पुष्प०**—हें ग काय! हे दागीने घालायचे उरलेच आहेत! इतकी घाई? तो गजरा देखील वेणीवर नीट बसला नाहीं! अग, जरा सावकाश चालशील

सां— रें ——— सां— निं सां ——— प धं —— प —— मं
हे ऽ ऽ भू ऽ ऽ ल झा ऽ ऽ न शू ऽ ऽ र म नी ऽ ऽ चू ऽ ऽ र व
० * ० * ० *

ध ध म ध प प नी ध सां सां गं रें सां निं ध प ग म सां —
सं त से ना स र सा वे ही वै रा गी स मु दा यी ही ई हो ऽ
० * ० *

नि — ध — प — रे ग रे प म सा ध नि सा — गं रें — सा—
हा ऽ हाः ऽ का र म द न र चि सु म न ना ऽ ना ऽ का ऽ र
० * ० * ०

( "मजेदार" "हार" "नानांकार" "हाहाः कार" "फार" यांतील "र" अल्पोच्चारित समजावा; व "वसंतसेना" पासून तों शेवटपर्यंत पद म्हणण्याची लय दुगण आहे असें समजावें. )

"तोडु या मुकुल" वगैरे दुसरा अंत्रा "येत हा मदनमित्र" या अंत्र्याप्रमाणें.

कीं नाहीं ?–तुझ्या या लगबगीनें वेणींतून निघून गजरा महाराजांच्या अंगावर पडला हो ! काय बाई करावें हिला ?

**धैर्य०**—पुष्पमाले, देवदर्शनाला ही कोण नाचत चालली आहे ?

[ भामिनी देवालयाकडे जाते.

**पुष्प०**—कोण म्हणजे ? सगळेंच आश्चर्य ! अगोदर देवदर्शन करीन आणि मग महाराजांच्या जवळ जाईन, असें मला तेथें म्हणाली, आणि इथें महाराजांच्या अंगावरून मुद्दाम म्हणून गेली !—थांब हो, सगळे दागिने घालून आल्याशिवाय तुला मी देवापुढें जाऊंच द्यायची नाहीं. [ जाते.

**धैर्य०**—कोण बरें ही नाचत गेली ? वनमालाच ! दुसरी कोण असणार ? मला वाटतें, हे हिरे, मोतीं म्हणजे सौंदर्याचा मदच होत. इतक्या दागिन्यांनीं फुलल्यानंतर तिचें पाऊल साहजिकपणें नाचल्यासारखें पडावें यांत आश्चर्य नाहीं. पण ती वनमालाच होतीना ? आतां येथें म्हणे भामिनी येणार आहे, आणि वनमालेपेक्षां आपण सुंदर आहों असा तोरा मिरविणार आहे. नटून-सजून ही भामिनी तर माझ्या पुढून गेली नसेल ना ?

[ पद ५२—" पवन चलसि अलिकेत " या चालीवर. ]

**चरण चपल, चटचट नाच होत, मृदुमृदुल चालली प्रमदा, तुडवित मम मन रत पदकमलीं ॥ ध्रु० ॥ हलत लोल, डुलत वेल, जणुं बोले मग मानिनी, रणरमण हत तव बल मजजवळी ॥ १ ॥**

[ शीलधर, विलासधर व लक्ष्मीधर येतात.

---

५२—राग-परज, त्रिवट.

ध़् नि सां रें नि सां नि ध़् प प म – ध़् सां – सां म ध़् सांनिध़म
च र ण च प ल च ट च ट ना ऽ च हो ऽ त मृ दु मृ दु ल

पनी – ध़् प मं ग म़् ग – सा सा ग ग म म ध़् नि सां रें
चा ऽ ल ली ऽ प्र म दा ऽ तु ड वि त म म म न र त

[ पुढें चालू

लक्ष्मी०—सेनापती कोठें आहेत ते लवकर मला दाखवा. माझा आनंद माझ्या अंगांत मावेनासा झाला आहे; आणि त्यांना केव्हां कडकडून भेटेनसें मला झालें आहे. अहो, उचला पाय, विलासधरजी, माझ्याप्रमाणें थोडें पळायला तरी शिका.

विला०—अहो, अशी पळापळ कां ? धैर्यधरजींचें दर्शन झालें म्हणजे सर्व गोष्टी मी त्यांच्यापाशीं तुम्हीं सांगितल्याप्रमाणें बोलतों.

लक्ष्मी०—आतां मला धीर आला; आतां सावकाश चालूं या.

धैर्य०—काय शीलधरजी, तुम्ही बाबासाहेबांना घेऊन नाहीं आलांत ?

शील०—मीं चोहोंकडे त्यांचा शोध केला, पण कोठें सांपडेनातच; इतक्यांत यांची गांठ पडली;—

विला०—आणि अनायासें हा भेटीचा योग जुळून आला.

लक्ष्मी०—आपली स्वारी येथें आहे, हें ऐकण्याबरोबर मला असें झालें, केव्हां एकदां धैर्यधरजींना कडकडून भेटेन. खोटें नाहीं. अहो, या शीलधरजींनीं एका शब्दानें तुमच्या आमच्या मधलें वांकडें सरळ करून टाकलें. एकाच शब्दानें एकदम सख्य झालें, मैत्री जडली, आणि प्रेम वाढलें. आपणाला राजकन्या—

---

नि सां रें सां निध् पमं—
प द क म ली ऽ ऽ ऽ ॥ ध्रु० ॥

म म ध् सां – सां सां सां सां रें – सां सां नि धनिं सां नि ध्
ह ल त लो ऽ ल डु ल न दे ऽ ल ज णु बो ऽ ळे ऽ

प ध् (मंपधंप) म् ग – सा नि सा सा ग ग म म ध् ध् रें सां रें
म ग मा ऽ नि नीं ऽ र ण र म ण ह त त व ब ळ म ज

नि सां नि ध्
जु ब ळी ऽ ॥ १ ॥

शील०—मीं जेव्हां यांना सांगितलें, राजकन्येशीं आपला विवाह ठरला असून लवकरच समारंभ मोठ्या थाटानें—

लक्ष्मी०—हें ऐकण्याबरोबर माझा दमच निघेना. तसाच धावून आलों, धापा टाकीत आलों. अहो, आम्ही श्रीमंत इतक्या जलदी कोठले चालायला ! लढाईतून पळ काढतांना देखील मी इतका धावलों नाहीं, असा बिजलीप्रमाणें आलों आपल्या दर्शनाला !

धैर्य०—इतक्या घाईचें कारण काय ?

लक्ष्मी०—राजकन्येशीं आपलें लग्न ठरलें, हें खरें ना ?

धैर्य०—हो, खरें !

लक्ष्मी०—बस्स; आतां तुमच्या आमच्यामध्यें तंट्याचें कारणच उरलें नाहीं. उत्तराधिपतीशीं जसा आपण तह केलांत तसा माझ्याशींही भामिनीसंबंधानें आपण तह करावा; तह करायला मी एका पायावर तयार आहें.

धैर्य०—तुमचें काय म्हणणें आहे तें नीट मला सांगा. दम कां लागला आहे तुम्हांला ? तेथें थोडा वेळ बसा आणि मग काय तें स्पष्ट सांगा.

लक्ष्मी०—हो, मी बसायचें विसरलोंच. ( बसून ) विलासधरजी, मी जरा विसावा घेतों. आपणच सेनापतीसाहेबांना माझी अर्जी सुनवून द्या.

विला०—आपला विवाह राजकन्येशीं ठरला, हें ऐकून सर्वांना आनंद होणें साहजिक आहे; आणि त्यांतल्या त्यांत लक्ष्मीधरजींना तर विशेष होत आहे. याचें कारण त्यांच्या मनांतून भामिनीशीं लग्न करायचें आहे; आणि आपल्यामुळें त्यांचें हें लग्न इतक्या दिवस ठरत नव्हतें.

धैर्य०—माझ्यामुळें कां म्हणून ?

लक्ष्मी०—कां म्हणून ? अहो, बाबासाहेबांच्या मनांत भामिनीला आपणाला द्यायची; भामिनीचेंही मन आपल्यावरच • बसलेलें; मग आम्हांला कोण विचारतो ? माझ्या वाटेंतला हा आपला कांटा दूर करण्याकरितां नानाप्रकारच्या युक्त्या योजल्या;-अहो, आम्हां श्रीमंतांच्या लबाड्या कोणाच्या ध्यानांतच याव-याच्या नाहींत;–आणि त्यामुळें तुमचें आमचें वांकडें आलें.–आतां आनंद झाला. हें पहा सेनापतीसाहेब, मला भामिनी पाहिजे. तुम्ही बाबासाहेबांना सांगा; लक्ष्मीधरजींनाच भामिनी द्या, म्हणजे मग तुम्ही आम्ही दोस्त. राजकन्येकरितां

महाराज आपल्या विवाहांत जितका खर्च करणार त्याहून अधिक खर्च माझे मित्राचे बाजूनें मी करीन. अहो, मी आणि भामिनी दोघे मिळून तुमच्या लग्नाचें देवक ठेवूं.

विला०—नवीन देऊळ बांधण्याइतकेंच पुण्य जीर्णोद्धाराला मिळत असतें; राजकन्येशीं विवाह करून नवीन घराण्याला आपण सुरवात करालच, पण यांना विवाह जर भामिनीशीं जुळवून दिला तर एक जुनें घराणें पायावर पुन्हा उभें केल्याचें श्रेय मिळेल.

लक्ष्मी०—( उठून ) आणि मग मी आतांच्याप्रमाणें असा कधीं बसून रहावयाचा नाहीं. वा! आमच्या कामाला शकुन तर उत्तम होत आहे; ते पहा बाबासाहेबच इकडे येत आहेत; " शुभस्य शीघ्रम्, " आपण एकदम मजकरितां भामिनीसंबंधानें गोष्ट त्यांच्यापाशीं काढा. [ बाबासाहेब व विनोद येतात.

विनो०—सरकार, बाबासाहेब आले आहेत.

धैर्य०—या, बाबासाहेब या-विनोदा, तुला इतका वेळ कां लागला?

विनो०—वनमालेच्या वडिलांना हुडकीत होतों; पण त्यांनीं कोठें काळें तोंड केलें, पत्ताच लागेना. अखेरीला कंटाळून यांना एकट्यांनाच घेऊन आलों.

धैर्य०—बाबासाहेब, आपणांला वनमालेचे वडील माहीत असतील—

लक्ष्मी०—माझी गोष्ट अगोदर काढा.

धैर्य०—थांबा हो जरा. वनमालेचे वडील आपल्या ओळखीचे असतील,-

बाबा०—कोण, वनमाला कोण? आणि तिचे वडील तरी कोण? माझ्या ओळखीची वनमालाही नाहीं, आणि तिचे वडीलही मला माहीत नाहींत.

विनो०—ही जोडी आलेली पाहून त्यांनीं बहुतेक येथून पोबारा केलेला दिसतो!

धैर्य०—नाहीं, ते येथें यायेला पाहिजे होते. वनमाला वाईट चालीची आहे, असा यांचा आरोप—

लक्ष्मी०—अहो, तें सगळें खोटें, उगीच कुभांड होतें. पण आतां काय त्यांतलें उरलें? अहो, भामिनीसंबंधानें तुमचें आमचें वांकडें पडलें, तेव्हां घेतला होता उगीच तुम्हांला लहानसा चिमटा! तें सगळें खोटें. तो या विषय सोडून. माझ्याबद्दलची गोष्ट काढा बाबासाहेबांपाशीं!

धैर्य०—तें जर, सर्व खोटें, तर वनमालेच्या वडिलांनीं आतां माझें तोंड कां थुंकवावें; येथून पोबारा कां करावा ? नाहीं; बाबासाहेब, तुमची आणि त्यांची ओळख आहे, आणि वनमाला गंगोदकाप्रमाणें शुद्ध आहे असा निरोपही पाठविलांत, आणि आतां यांना पाहून उडवाउडवी कां ?

लक्ष्मी०—अहो, तें सगळें खोटें; अशा कित्येक लबाड्या आमच्या श्रीमंतीच्या पांघरुणाखालीं खुशाल वावरत असतात ! त्याची कसली चौकशी यांनीं आरंभिली आहे ?

धैर्य०—बाबासाहेब, मोकळ्या मनानें मला काय तें खरें सांगा. उडवाउडवी नको. मी जन्माचा सुखी होणें किंवा दुःखी होणें हें आतां तुमच्या शब्दावर अवलंबून आहे.

बाबा०—अहो, मी खरें खरें सांगतों, मला वनमाला व तिचे वडील बिलकुल माहीत नाहींत.

धैर्य०—मग तुम्ही येथें कां आलां ?

बाबा०—कां आलों ? अहो मला निरोप आले, पत्रें आलीं, कीं आपण भामिनीशीं लग्न करायला तयार आहां म्हणून—

धैर्य०—ते निरोप यांच्यासंबंधाचे असतील—

बाबा०—नाहीं, ते आपल्यासंबंधाचेच होते. इतकेंच नव्हे तर आतां इतक्यांत–क्षणापूर्वीं–मला सांगितलें कीं, आपण माझे जामात व्हायाला अगदीं उतावीळ झालां आहां म्हणून.

धैर्य०—वा ! हें आपणाला सांगितलें तरी कोणीं ?

[ भामिनी व पुष्पमाला देवाचे गाभाऱ्यांतून बाहेर पडतात. ]

बाबा०—कोणीं म्हणजे ? हिनें सांगितलें.

शील०—काय ? राजकन्येनें हें खोटें सांगितलें ?

धैर्य०—काय माझ्या वनमालेनें तुमची ही अशी थट्टा केली ?

बाबा०—या माझ्या भामिनीनेंच मला तसें सांगितलें.

भामि०—होय, मींच सांगितलें; आणि ही भामिनी कांहीं लटकें बोलली नाहीं.

[ पद ५३.--" पियाको मिलनवा " या चालीवर. ]

**प्रिया अपराधी मी ती भामिनी ॥ ध्रु० ॥ घ्याहो पदरीं सदया मजला, विमला सुसमागमें समजुनी ॥ १ ॥**

( धैर्यधराचे गळ्यांत हार घालते. )

**धैर्य०**--होय, बाबासाहेब, हिनें सांगितलें तें कांहीं खोटें नाहीं. श्रीमंतींत जन्मून, श्रीमंतींत वाढून, उत्कृष्ट आचरणाचा कित्ता सर्वांना-गरिबांनाही-घालून देणाऱ्या या सद्गुणमंजरीनें,-लक्ष्मीच्या शक्तींतील मंगलदायक तेजाच्या अंशाच्या या प्रत्यक्ष मूर्तीचें,-तुमच्या भामिनीचें,-माझ्या वनमालेचें-पाणिग्रहण करायला, बाबासाहेब, मी खरोखर उत्सुक झालों आहें.

**बाबा०**--माझ्या भामिनीचा हा हात मी मोठ्या आनंदानें आपल्या हातांत देतों. ( तसें करतो ) धैर्यधरजी, महाराजांच्या आज्ञेप्रमाणें राजधानींत जाऊन लग्नसमारंभ मोठ्या थाटानें करूं. त्या मंगलसमयीं आतांचे प्रमाणेंच श्रीशंकर आमचें कल्याण करो, अशी परमेश्वराचे पायाशीं माझी प्रार्थना आहे.

५३-राग भैरवी, केरवा.

प प - ध॒ प म॒ प ग॒ म॒ ग॒ - ग॒पग॒म॒ रे ग॒ रे॒ सा———
प्रिया ऽ अ प रा ऽ धी ऽ मी ऽ ती ऽ भा ऽ मि नी ऽ ऽ ऽ
* * * * *

ग॒ ग॒ - रे ग॒ साग॒ रे॒ नि॒ - सा - सारे॒ग॒म॒ रे ग॒ रे॒ सा———
प्रिया ऽ अ प रा ऽ धी ऽ मी ऽ ती ऽ भा ऽ मि नी ऽऽऽ ॥ ध्रु० ॥
* * * * *

सा - सा रे॒ ग॒ ग॒ म॒ - ग॒ ग॒ (ग॒म॒पग॒म॒) रे॒ ग॒ रे॒ सा
घ्या ऽ हो ऽ प द रीं ऽ स द या ऽ म ज ला ऽ
* * * *

प प प - ध॒ प म॒ - ग॒ म॒ - प म॒ ग॒ रे॒ सा
वि म ला ऽ सु स मा ऽ ग में ऽ स म जु नी ऽ ॥ १ ॥
* * * *

[ पद ५४.—" आद्या स्मरदमना " या चालीवर, त्रिताल. ]

गंगामदशमना । पावना । दे विमलमना बहुधनवाना ॥ ध्रु० ॥ गंगा चपल, गर्वा अखिल वाहे, जलधना । दे० ॥ १ ॥ घाली ती महीवरी उडी खरी, पहा धरी स्वशिरीं,

५४-मालकौंस, त्रिपट.

नि – ग – सा नि ध नि सा — म – म ग – म ध नि सां नि
गं ऽ गा ऽ म द श म ना ऽ ऽ पा ऽ व ना ऽ दे ऽ वि म ल

ध नी – ध म ग म ग म सा –
म ना ऽ ब हु ध न वा ऽ ना ऽ ॥ ध्रु० ॥

म – ग — म ध नी सां नि सां — सां नि ध नि ध नी —
गं ऽ गा ऽ ऽ च प ल ग ऽ र्वा ऽ ऽ अ खि ल वा ऽ हे ऽ ऽ

ध नि ध म ग – म – म ग –
ज ल ध ना ऽ ऽ पा ऽ व ना ऽ दे ऽ विमलमना बहुधन ॥ १ ॥

सा —— म —— ग – म ध – नी सां – सां नी – सां ध—
घा ऽ ऽ ऽ ली ऽ ऽ ऽ ती ऽ म ही ऽ व रि ऽ उ डी ऽ ख री ऽ

नी म – ध ग – म ग म – ध म ध – नि ध नी – सां नि सां–
प हा ऽ ध री ऽ स्व शि री ऽ शि क वी ऽ ली ऽ ला ऽ स क ला ऽ

सां नि – सां ध – नि म ध ग – म ग – म – म ग –
व ला ऽ म दा ऽ स्म रा ऽ रि सा ऽ ह्नि ना ऽ पा ऽ व ना ऽ

दे विमल मना बहुधनवाना ॥ २ ॥

[ पर्दे जा

शिकवी लीला सकला बला, मदा स्मरारि साहिना पावना ॥ २ ॥ ज्ञानासन्निध गेली, मननसुबोधें पवित्र केली, समर्थ झाली बहुजनमदमलविलासविपाकविनाशरणा ॥ ३ ॥

[समाप्त.]

सा – सा – ग् सा नि् सा ग् – ग् – म् ग् सा ग् म् – म् –
ज्ञा ऽ ना ऽ सं ऽ न्नि ध गे ऽ ली ऽ म न न सु बो ऽ धें ऽ
० – * – ०

ध् म् ग् म् ध् – ध् – नि् ध् म् ध् सां – सां – गं सां नि् ध्
प वि ऽ त्र के ऽ ली ऽ स म ऽ र्थ झा ऽ ली ऽ ब हु ज न
– * ० –

सां नि् ध् म् सां नि् – ध् नि् ध् – ग् ध् म् – ग् म् ग् –
म द म ल वि ला ऽ स वि पा ऽ क वि ना ऽ श र णा ऽ
* – ० – *

म् – म् ग् —
पा ऽ व ना ऽ दे विमलमना बहुधनदाना ॥ २ ॥
–



# सुबोध वचनें अथवा म्हणी.

हीं साधुसंतांचीं वेदवाक्यें अनादि कालापासून निरनिराळ्या साधुसंतांनीं आपापल्या ग्रंथांतून गोंवून ठेवलेलीं आहेत. हीं वाक्यें लहानथोर स्त्रीपुरुषांना सदैव दृग्गोचर व्हावींत म्हणून आम्हीं मुद्दाम चित्रविचित्र रंगांनीं व मोठ्या ठळक अक्षरांनीं वरील २१ प्रकारच्या म्हणी छापून काढलेल्या आहेत. प्रत्येक शालागृहांतून, सभागृहांतून, वाचनालयांतून किंबहुना प्रत्येक घरांतून---ज्या ज्या ठिकाणीं विशेषतः लहान मुलें तरुण स्त्री-पुरुष, वृद्ध माणसें यांचें सहज लक्ष जाईल अशा ठिकाणीं—हीं सोन्याचीं अक्षरें ठिकठिकाणीं टांगून ठेवणें, हें प्रत्येक संस्थेच्या चालकास, प्रत्येक मंदिराचे व्यवस्थापकास, प्रत्येक शाळेचे शिक्ष-कास, प्रत्येक बोर्डिंगचे सुपिन्टेन्डेंटास, प्रत्येक आईबापास किती श्रेयस्कर, किती नीतिकारक, किती हितावह आहे याची कल्पना प्रत्यक्ष ही गोष्ट केल्याशिवाय समजणार नाहीं. लहान मुलांच्या हृत्पटावर हीं वाक्यें पूर्णपणें कोरलीं जावीं व त्यांनीं आपल्या पुढील आयुष्यांत नीतिमान् निपजावें अशीं ज्या थोर आईबापांची इच्छा असेल त्यांनीं तर वरील म्हणी अवश्यच आपल्या घरीं लावाव्यात. वरील म्हणी नकाशाप्रमाणें कापडावर लावून रूळपट्टी व वार्निशसहही विक्रीस तयार आहेत. एके [illegible] तीन म्हणी अशा नकाशास किं० /१०; २१ म्हणींचे ७ नकाशे एकदम घेणारास किंमत ३/८. प्रत्येक म्हणीस किं० //९. एकदम २१ म्हणींची किं० /१४ ट. ह. /१.

म्यानेजर---चित्रशाळा प्रेस, पुणें.